# गंगावर्णन आर्या.

हें पुस्तक,

## गणपतराव हरिहर पटवर्धन कुरुंदवाडकर

यांणीं केलें,

तें




पुणें पेठ बुधवार येथें,

गंगाधर गोविंद सापकर यांचे छापखान्याचे मालक भाऊ गोविंद सापकर यांणीं आपले 'ज्ञानचक्षू' छापखान्यांत छापिलें.

आवृत्ति १ ली.

तारीख १ माहे फेब्रुवारी सन १८७४ इसवी.



शके १७९५ श्रीमुखनामसंवत्सरे.

# प्रस्तावना.

आलीकडे या महाराष्ट्र देशांत इंग्रजी राज्य जाहल्या पासून सर्व गोष्टी सुधारत चालल्या आहेत, असें बहुतेकांचें मत असून कांहीं खरेंही आहे, तथापि यास अपवादच नाहींत असें समजूं नये. पुष्कळ गोष्टी माझ्यामतें अशा सांपडतील, कीं पूर्वकालीं ज्या उत्तम अवस्थेंत होत्या, त्या हल्लीं अगदीं निकृष्ट अवस्थेस येऊं लागल्या आहेत, त्यां पैकीं प्रकृत विषयास लागू असा कविता व कवि हाच विषय उदाहरणास घेऊं. वास्तविक विचार केला असतां, सर्व जगांतील दृश्यादृश्य पदार्थांतून पाहिजे त्या पदार्थाचें शब्दरूपी चित्र बनविणारा कवि होय, व तें चित्र कविता होय, यावरून हे पदार्थ किती मौल्यवान् आहेत व अशा मौल्यवान् पदार्थाला धारण करणारेही किती योग्य असले पाहिजेत याचा सुज्ञानीं विचार करावा. कवि हा पदार्थ धारण करण्यास कालिदास, भवभूति प्रभृतीच योग्य, तसेंच कविता ह्मणण्यास त्याणीं केलेलें शाकुंतल नाटक, उत्तर रामचरित्र नाटक इत्यादि ग्रंथच योग्य, परंतु आलीकडे कवि हा शब्द इतका स्वस्त जाहला आहे कीं, कोणी ह्वातो हें भूषण सहज मिळऊं शकतो, आलीकडील मोठ्या मोठ्या देखील इंग्लिश शिकलेल्या विद्वानांचें असें मत आहे कीं कविता अगदीं सोपी असावी हें ह्मणणें वास्तविकही आहे. काव्यप्रकाश नामक ग्रंथांत उत्तम कवितेचें लक्षण सांगितलें आहेः—

श्रुतमात्रेणशब्दानांयेनार्थप्रत्ययोभवेत्॥
साधारणःसमग्राणांसप्रसादोगुणःस्मृतः॥१॥

अर्थ, कवितेंतील बहुत करून शब्दांचा अर्थ श्रवणकरतांच मनांत

यावा यासप्रसाद गुण ह्मणतात, हा उत्तम गुण काव्यांत सर्वदा असला पाहिजे, यावरून काव्य सोपें असावें हें खरें, परंतु याचा अर्थ एकाद्या बखरी प्रमाणें काव्यसोपें असावें असानव्हे, केवळ काव्यांत कल्पनाक्लिष्ठ असूं नयेत, इतका याचाभाव आहे. माझे मतीं साधारण भाषण हें एक सागवानी लांकडाप्रमाणें होय, आणि काव्य हें जसें त्या लांकडावर खोदून वेलबुठाचें काम करणें होय, आणि हें जर खरें आहे, तर साधें लांकडाच्या किमतींत आणि वेलबुटी काढून शोभित केलेल्या लांकडाच्या किमतींत व शोभेंत किती अंतर येईल हें सांगण्याची जरूर नाहीं. तसेंच साधे भाषणांत आणि सालंकार सरस भाषणांत अंतर येईल हें सागणें नको, सांप्रत मोठे मोठे बी. ए. सारख्या विद्वानांनीं केलेलें गद्यात्मक, पद्यात्मक, कादंबऱ्या, नाटकें, काव्यें वगैरे ग्रंथ बहुत आहेत, ते बखरी प्रमाणें आहेत किंवा सरस काव्या प्रमाणें आहेत याचा विचार सुज्ञानीं करावा. आणखी आलीकडील कांहीं चांगल्या चांगल्या विद्वान् लोकांचें ह्मणणें असें आहे कीं, प्राकृत कवितेंत संस्कृत शब्द आणूं नयेत, हें ह्मणणें कांहीं अंशीं खरें आहे, कारण ज्या भाषेंत कविता करणें असेल त्याच भाषेंतील शब्द घालावेत, अन्य भाषेंतील शब्द घातल्यानें भाषा मिश्र होऊन भाषेच्या आंगांतील शुद्धता जाते, परंतु हें ह्मणणें ज्या भाषा पूर्ण दशेस आल्या असतील त्यांविषयीं योग्य आहे, आमच्या प्राकृत भाषेंतील संस्कृत काढून टाकिलें तर प्राकृत भाषेचें भाषा हें रूपच जाऊं लागेल, याकरितां संस्कृत शब्दांच्या सहाया वांचून प्राकृत कविता करण्यास सांगणें ह्मणजे केवळ एक वर्षाचे मुलास आपले मातेचा हात नधरितां चालावें ह्मणून सांगितल्या सारखें असमंजस सांगणें होईल. कालिदास प्रभृति हेच कवि व त्यांचे ग्रंथ ह्याच कविता, इतर कवि

नव्हेत व त्यांणीं रचलेले ग्रंथ ते ग्रंथ नव्हेत, असें ह्मटलें तर कालिदासा सारखे जे असतील त्यांणींच ग्रंथ करावे इतरांनीं करूं नयेत कीं काय? असें कोणी विचारील तर त्यास उत्तर हेंच आहे, होय,साधारण मनुष्या नें ग्रंथ करूंचनयेत.कारण चांगली कविता देशांत असणें हें देशास जसें मोठें भूषण आहे तसेंच वाईट ग्रंथांची वृद्धी होणें हा देशास मोठा कलंक आहे, शेवटीं (न निर्दोषं न निर्गुणं) या न्यायानें अगदीं निर्दुष्ट काव्य होणें अत्यंत कठीण आहे ह्मणून गुण फार आणि दोष विरळ असें तरी काव्य असावें, नाहीं तर शाईनें स्वच्छ कागदाची खराबी करणें बरावर वाटत नाहीं. कोणी तर हें सर्व एकीकडे ठेवून कालिदासादिकांची जुनी कठिण पद्धति आहे करितां आह्मी ही नवीन सोपी पद्धति काढिली आहे ह्मणतात, हें ऐकून तर अत्यंत विस्मय वाटतो यांत अश्चर्य नाहीं. जर साधारण लोक कविता करण्यास योग्य नव्हेत असें आहे तर कविता करण्यास तूंच कां प्रवृत्त जाहलास असें मला कोणीही विचारील, त्यास माझी प्रवृत्ति होण्याचें कारण असें आहे कीं, हजार रुपये मोलाचें वस्तू जर सहज रुपया आठ आण्यास मिळूं लागलें तर तें मिळवूंनये असें कोणासही वाटणार नाहीं. तसेंच कवि हा जो अमूल्य दागिना तो सहज मिळण्याचा जर काल आहे तर तो मिळवावा असें वाटणें जीवाचा सहज धर्म आहे. आतां ही कविता, पुण्यांतील दक्षणा प्राइज कमिटीनें पसंत करून वक्षीस दिलें आहे तथापि हे रुपये या कवितेच्या गुणांवर कमिटीनें दिले असतील असें मला वाटत नाहीं. फक्त ही या कमिटीची मेहेरबानी समजून मी तिचे बहुत आभार मानीत आहें. सदहू कमिटीनें तीनशें श्लोक करावे आर्या केल्या तर दोन आर्यांचा एक श्लोक

गणिला जाईल अशी जाहिरात दिली होती, त्याप्रमाणें सहाशें आर्याच मी केल्या या सर्व कवितेंत दुसरा छंद घातला नाहीं. कोठें कोठें चांगल्या संस्कृत श्लोकांचीं भाषांतरें करून ही घातलीं आहेत, यापुस्तकाचे शेवटीं कोणत्या भाषेंतील काव्यें चांगलीं या विषयावर एक यथामति निबंध लिहिला आहे. तो सुज्ञांनीं मनःपूर्वक वाचून पहावा अशी मी फार नम्रपणें विद्वज्जनांस प्रार्थना करितों.हा संपूर्ण ग्रंथ मी अत्यादरें माझी तीर्थरूप मातुश्री पार्वती बाई व माझे पितृव्य तीर्थस्वरूप विनायकराव आप्पासाहेब व कैलासवासी त्र्यंबकराव आबासाहेब यांचे पदकमलीं अर्पण केला आहे, आतां शेवटीं सर्वेश्वर श्रीगजाननाचे व गंगेचे चरणीं माझ्या जननीस व आप्पासाहेब काकांस चिरायु करावें, आणि आबासाहेब काकांस अखंड स्वर्गवास द्यावा अशी प्रार्थना करून ही प्रस्तावना समाप्त करितों.

समाप्त.

॥ श्रीगजानन प्रसन्न ॥

स्ववंशवर्णन.

कोंकणदेशींआहे ग्रामजयानामहोयकोतवडें ॥
अस्मत्कूटस्थतिथें होतेज्यांढुंढिभक्तिबहुअवडे ॥ १ ॥
पटवर्धनहरभट्ट प्राशुनिदूर्वारसासिमात्रपहा ॥
ज्यांहीं निष्कामतपा केलेंपरिलाभपावलेंचिमहा ॥ २ ॥
क्षिप्रप्रसादनेंत्यां देउनिऐश्वर्यसहितपुत्रसहा ॥
अंतींस्वसेवकांला बोलेस्वानंदभुवनआजिपहा ॥ ३ ॥
कृष्णंभट्टहिबाळं भट्टत्र्यंबकतसेमहाशूर ॥
गोविंदरामचंद्रहि भास्करहेंपुत्रषट्कबहुधीर ॥ ४ ॥
त्यांततिघेन्यूनपरीं तिसरेचवथेहिपांचवेथोर ॥
श्रीमान्श्रीमंतानीं केलेकींशत्रुसर्पहेंमोर ॥ ५ ॥
करुनीकुरुंदवाड ग्रामदुजीमिरजतासगांवतिजें ॥
संस्थानेंस्वनिवासा नित्यविपक्षक्षयार्थधांवतिजें ॥ ६ ॥
त्यांतत्र्यंबकहरिला सुतझालेनीलकंठकोन्हेरी ॥
हैदरयुद्धींअभिमुख मरतांयत्कीर्तिहोयसोनेरी ॥ ७ ॥
रघुनाथरायतत्सुत मौक्तिकतैसेदुजेहिशिवराय ॥
रघुनाथालासदनीं लीलाअवडेरणींपराघाय ॥ ८ ॥

१ मूलपुरुष २ गणपतीनें ३ हरभट्टास ४ मरणकालीं ५ हरभट्टाला ६ गणेशलोक ७ पेशव्यानीं ८ तिघेबंधू ९ शत्रू १० कोन्हेरराव यास कोन्हेरीहि ह्मणत असत ११ टिपु सुलतानाचा बाप १२ शत्रूला १३ जखम × थोरले दादासाहेब * सुभेदार साहेब.

[1]विष्ण्वालय[2]कृष्णातटिं [3]घट्टादिकज्यांहिंबांधिलें[4]पूर्त ॥
[5]ज्यांतेंपाहुनिह्मणती जनहेशृंगारवीररस[6]मूर्त ॥९॥
त्र्यंबकरायतयाला पुत्रजयापार्वतीअसेभार्या ॥
[7]पत्यनुगमनेंमिळवी जोइहपरभवपातिव्रताकार्या ॥१०॥
[8]केशवरायतयाचे सुतलक्ष्मीज्यासिजाहलीरमणी ॥
नामेंचिनस्वभावें सुताहितयाचारजेंविही[9]रंमणी ॥११॥
[11]रघुनाथहि[12]हरिहरही [13]विनायक[14]त्र्यंबकहितसेराय ॥
[15]ज्येष्ठज[16]केशव[17]यन्मृति ह्मणवीत[18]स्त्रीसयौवनींहाय ॥१२॥
[19]पुढंतरिरघुनाथात्मज [20]चिंतामण्याव्हदूसराझाला ॥
हरिहरसुतमी[21]गणपति परिनसजे[22]स्वामिनामदासाला॥१३॥
[23]हरिहरविनायकात्मज पुत्रार्थत्र्यंबकासतीनजरी ॥
[24]दाराहिपुत्रत्रयही झालेस्वल्पायुकायदैवतरी ॥१४॥
तेरावेंवर्षमला असतांस्वर्गासिमत्पितागेला ॥
वाटेअयोग्यसुतमी तदुदरिंझालोंह्मणूनिरागेला ॥१५॥
माझीपितामहीतों भिजवीसतताश्रुनींस्ववदनास ॥
किंबहुना[25]सार्धाब्दें सुतशोकेंजायदेवसदनास ॥१६॥

---

१ विष्णु-आलय विष्णुमंदिर २ कृष्णानदीतीरीं ३ घाटाची इमारत ४ बिहिरी, तळीं इत्यादि ५ रघुनाथरावातें ६ मूर्तिमान् ७ सती जाण्यानें ८ बाबासाहेब ९ स्त्री १० हिऱ्या-च्या मण्यासारखे उत्तम ११ दादासाहेब+आप्पासाहेब १२ भाऊसाहेब १३ आप्पासाहेब १४ आबासाहेब १५ ज्येष्ठ-ज रघुनाथरावाचे चिरंजीव १६ बाबासाहेब १७ ज्याचें मरण १८ राधाबाईस १९ द्वितीय पत्नी सीताबाई त्यांचे ठायीं २० बाळासाहेब २१ बापुसाहेब २२ गणपतीचें नाम २३ दाजीसाहेब २४ भवानीबाई, उमा, अन्नपूर्णा. २५ स-अर्ध-अब्द दीडवर्षांनें*रघुनाथराव दादासाहेब.

मन्मातृपार्वतीभव शोकभरहिवर्णवेनमन्मतिला ॥
राहोस्वजीवरक्षण सुतरक्षणहीतदासुचेनतिला ॥१७॥
ऐशाविषमींसमयीं मदवनकेलेंकनिष्ठकाकांनीं ॥
जेसुजनपरांहिनते स्वीयाकथितीअनिष्टकां,कानीं ॥१८॥
होतोंसंसृष्टतिघे ज्येष्ठापासुनिविभक्तबहुकाल ॥
परिअस्मद्दुर्दैवें बोलावीत्र्यंबकासमगकाल ॥१९॥
स्वाप्तांसिसेवकांसहि दीनास्त्रीलाहिअन्नपूर्णेला ॥
टाकुनिगेलेस्वर्गा स्वयशानेंकरुनिछिन्नपूर्णेला ॥२०॥
संसृष्टएकमातृज अप्रजमृतबंधुधनहरीलअसे ॥
शास्त्रपरित्र्यंबकमज देस्वविभागार्धकींकृपालुतसे ॥२१॥
कथिलाहरिवंशअसा संक्षेपेंज्यांतहोयमीकीट ॥
गंगास्तवनयथामति करितोंपापाद्रिव्हावयापीठ ॥२२॥
मन्मातृपितृव्यातें गंगास्तुतिमत्कृताउपायनहो ॥
कींतत्कृतोपकारा फेडायामजदुजा उपाय न हो ॥२३॥

वंशवर्णन समाप्त.

---

१ माझेंरक्षण २ संकटकालीं ३ विभक्त होऊन एकत्र झालेले ४ झांकणें ५ पूर्णा—इला संपूर्ण पृथिवी ६ सखेबंधू ७ किड्यासारखा य:काश्चत्मनुष्यप्राणी ८ मातापार्वती पितृव्य आप्पा साहेब व आबा साहेब ९ मीकेलेली १० नजराणा ११ होवो.

## ॥ श्रीगंगावर्णनार्याप्रारंभः ॥

मंगलाचरण.

नामें विपूर्व नायक तेजोमय परिन विष्णुवाहनतें ॥
नमितों त्या तेजातें गंजवाह विवांह नंदिवाहनतें ॥१॥
जो अंग्रपूज्य भगवान् भक्तां पुरुषार्थ दे त्वरें सर्व ॥
यच्चरणसेवकांतें तदितर देवेश वाटती खर्व ॥२॥
तें यंद्वसति स्थलजन ह्मणती स्वांनंद पूर्वाज्या भुवन ॥
कैलास सत्यलोकहिं पावति जेथोनि संकटीं अंवन ॥३॥
जेथें जनसकळ सुखी ज्वर हिक्कां श्वास कांस नचपटकी॥
अणिमाद्यष्टौ सिद्धिहि यत्र त्या सेविती जशाबटकी ॥४॥
इक्ष्वब्धिसुपर्यंकीं निजतो जो सिद्धिबुद्धिच्यासहित ॥
तत्पदाचिसेव्यमनुजाव्हावें भवसागरीं हि ज्यासहित॥५॥
करुं ह्मणतों गंगास्तव परिगद्या जाणतों न मी पद्या ॥
माझी लज्जा तुजला यास्तव ये दावि शीघ्र मंजपद्या॥६॥
कविचा प्रंकाशनसतां बैसूंमी इच्छितों कविसमाजीं ॥
पाहुनि तें कीं राहुहिशिरला रव्यादि सुग्रहां माजीं ॥७॥

---

१ वि आहे पूर्वी ज्याच्या असा जो नायक तो विनायक ह्मणजे गणपति आणि गरुड २ गरुड ३ इंद्र ४ ब्रह्मदेव–विष्णु ५ शिव ६ नमस्कार करितों ७ प्रथम पूज्य ८ हलके ९ ज्याचें राहण्याचें स्थान १० स्वानंद भुवन ११ ही पदानें वैकुंठ १२ रक्षण १३ उचकी १४ खोकला १५ इक्षुसमुद्र १६ मार्ग १७ कविपक्षीं ज्ञान–राहुपक्षीं तेज.

गंगास्तुति.

आर्या देवीगंगा ह्मणुनि तिचा स्तवहि योग्य आर्यांनीं ॥
आर्यांनींच करावा नच माझ्या सारिख्या अनार्यांनीं ॥८॥
ठावें ह्मणुनिस्तवितोंजरिनाहीं ज्ञान किमपि मज खोल ॥
मातेला न दुजें प्रियबाळाचे जेंवि बोबडे बोल ॥९॥
त्वत्तोयपतितपशुही देवेंद्रातेंहि वांकुल्यां दावी ॥
देवहि ह्मणती माते आह्मां गंगा जलस्थ यांदावी ॥१०॥
आसन्नमृति नरांतें न्याया यमदूत उग्रतरवारी ॥
घेउनि येती त्यांतें प्रोक्षित तव जलचिशीघ्र तरवारी॥११॥
गच्छति ह्मणुनि गंगा पदसाम्या करिति निम्नगा बहुत ॥
परितूं शंक्ता न दुजी करावया देह शुद्ध पापहुत ॥१२॥
आंगें यावें लागे दूरकराया तमासि तरणीतें ॥
त्या त्वत्स्मरणचि नाशीकाय वदूंयात्वदीय करणीतें॥१३॥
शक्त असे रविपरिनच नाशाया तो गुहागत तमातें ॥
नरहृद्गुहातमा श्रुति सांगति तूं नाशिसी सततमातें॥१४॥
हरिरवि तमासि परिखर शीतल विधु परिहरीतमानतसे॥
शीतातेंमोहराही पाहुनितवचरणिं होतिजन नंत,से॥१५॥

---

१ श्रेष्ठा २ आर्यांहिं दांनीं ३ वेडावणें ४ जलजंतु ५ आसन्न मरण ६ त्वरित ७ निवारी ८ जातात–वाहतात ९ नवा १० समर्था ११ दहन १२ स्वतः १३ अंधकारातें–अज्ञानातें १४ सूर्यातें १५ मनुष्याच्या हृदय रूप गुहांत राहणारें जें तम ह्मणजे अज्ञान १६ वेद १७ आई १८ तीक्ष्ण १९ सूर्या सारखे २० अज्ञान हरण करणारी २१ नम्र २२ शंभर.

पर्वतनाशकराया वाटेतोपावलापवित्रास ॥
नरपापनगविनाशन सुकर असे तव जला पवित्रास॥१६॥
ब्रह्मघ्न गोघ्न मद्यप हेमस्तेयी हरीहि परदार ॥
स्नातजलींजरितुझिया नरकाचें पाहतो न नर दार ॥१७॥

मेरुपर्वतावर गंगेचें आगमन.

होतीस सत्यलोकीं ब्रह्मव्यापार पात्रजल हेतूं ॥
तेथुनि नरलोकातें याया ऋषि कथिति भव्यहा हेतु ॥१८॥
बलिकृत मख भीतेंद्रें प्रार्थियला रक्षणार्थ तो विष्णू ॥
कश्यप पुत्र जहाला सर्वत्रहि सर्वदा हि जो जिष्णू ॥१९॥
जपलाद्वादशवर्षें कश्यपदत्ताषडक्षरामनुला ॥
प्रकटेहेरंबप्रभु विजयीहोजाह्मणेधरुनिहनुला ॥२०॥
वामननंतर गेला बलिलागीं त्रिपद भूमि मागाया ॥
बलिबोले घेसारी मागसि इतुकीच भूमिकांगा या ॥२१॥
सांगे बलीस गुरुकीं श्रीविष्णु असे नव्हेचि वामन हा॥
देशीलदान जरितरि पश्चात्तापें ह्मणेल तव मन हा ॥२२॥
इंद्रप्रियार्थ कपटें वामन रूपें उपेंद्र बा आला ॥
दिधल्यादान विराटें देहें घालील तुजवरी घाला ॥२३॥

---

१ वज्र २ भय ३ लोकांचे पापरूप पर्वत यांचा नाश. ४ सुवर्ण चोरणारा ५ श्रेष्ठ गुरु-पितृ पितृव्यमातुलादिकांच्या स्त्रिया. ६ कल्याणरूपी ७ बलीनें केलेल्या यज्ञानीं भयपावलेल्या इंद्रानें ८ जयशील ९ मलाबलीला १० शुक्र ११ खेदोद्गार १२ विष्णु १३ ईश्वररूपानें.

करुनी हास्य बलिह्मणे वदतां ऐसें कसें अहोगुरुजी ॥
दवडूं केंवि नकारें चिरलब्धा दान कीर्ति हे उरु जी॥२४॥
जरि होय विष्णु हातरि मजला देवेश पावला नवसा ॥
पसरी हात मजपुढें भिक्षार्थ रमापती हि मानवसा॥२५॥
ऐकेन मी न तुमचें इच्छित बटुचें अतांचि पुरवीन॥
जावो राहो जीवितें परि आचंद्रार्क कीर्ति उरवीन॥२६॥
एवं वदोनि त्याच्या हस्तीं दानोदकासि त्या दनुजें॥
देतांचि वाढवीलें स्वीय शरीरासि जिष्णुच्या अनुजें॥२७॥
व्यापी एकपदें भू चरणें अन्येंहि फोडिलास्वर्ग ॥
झालामार्ग निघालिस आलिस तारावयासि मनुसर्ग॥२८॥
स्वपराक्रमगर्वितहरि करि चरणस्पर्श तूज विधिलोकीं ॥
परिभवरुष्टस्वबला दाऊं आला तैवाघनिधि लोकीं ॥२९॥
पात्रासि रंध्रकरितां जलगळतें ह्मणुनि कायरंध्रकरा॥
ह्मणतां तज्जलकर्ता जनहो कांहीं तरी विचारकरा ॥३०॥
विष्णु स्तुत्यर्थचि मुनि देति तुला हरिपदोद्भवा नाम॥
परिपरमार्थेनह्मणो जन हें ज्या पाहिजें तुझें धाम ॥३१॥
स्वर्गच्युत ओघ तुझा येउनियां मेरु पर्वतीं राहे ॥
तेथुनि भूवरि याया अत्यद्भुत हेतु दूसरा आहे ॥३२॥

---

१ मोठी २ शिव. ३ वामनाचें ४ प्राण ५ चंद्रसूर्य असे पर्यंत ६ बलीनें ७ इंद्राच्या * कनिष्ठ बंधूनें विष्णूनें. ८ मानव ९ ब्रह्मलोकीं १० पराभवानें कोपलेला ११ तुझा ओघरूप ठेवा १२ जनाचेठायीं.

मृत्युलोकीं गंगेच्या येण्यास हेतुभूत सगरचरित्र.

रविवंशीं नृपझाला होता प्रख्यात सगर नामानें ॥
कोपानें लोभानें तैसाजो जिंकिला न कामानें ॥३३॥
होतावास अयोध्या नगरीं या सार्वभौमराजाचा ॥
सांगे प्रताप रिपुला युद्धकरुनि यासर्वेमराज्याचा ॥३४॥
भार्या दोघी होत्या सगरनृपालांगिं केशिनी सुमती ॥
षष्टिसहस्रदुजीला पहिलीला होयएकसुत कुमती[1] ॥३५॥
असमंजनाम याचें अन्यांचें नाम सागरचिहोतें ॥
असमंजदुष्टयास्तव जनककृपा पात्र जाहले होते[2] ॥३६॥
एकोनशताश्वमखा[3] नृपहस्तें श्रीवसिष्ठमुनिकरवी ॥
करण्यासि शंभरावा राजकरीं स्रुचिस[4] जेधवां धरवी ॥३७॥
भ्यालाइंद्र स्वस्थल जाइलहोतांचि यज्ञ हापूर्ण ॥
हयहरण हेतु धरुनी आलातो मर्त्य भूमिवरि तूर्ण[5] ॥३८॥
श्रीमद्वसिष्ठमुनिनें करुनी संकल्प सोडितां वाजी ॥
नृपसांगे सागरहो हयरक्षाया ससैन्यधांवाजी ॥३९॥
येतांवनांतघोडा इंद्रैंसैन्यासमक्ष तो हरिला ॥
परित्यांहींरणकरुनीं आणिलामेध्याश्वजिंकुनीहरिला ॥४०॥
कपटें वेषें पुनरपि शक्रेंचोरोनि मेध्य हय नेला ॥
कपिलाश्रमांत त्यातें बांधुनि अमरावतीस तो गेला ॥४१॥

---

१ वाईट बुद्धीचा २ सागर ३ नव्याण्णव अश्वमेध ४ यज्ञपात्रविशेष ५ सत्वर ६ यज्ञियाश्व ७ इंद्राला ८ अश्वातें ९ इंद्रपुरीप्रत १० इंद्र.

सेनेमाजिनदिसतां शोधितिसर्वीदिशांत हि[१]यास ॥
ईशानी[२] दिग्दावी एका गर्ता[३]सि नंतर तयां[४]स ॥४२॥
सागर गर्तद्वारीं हयखुर चिन्हांसि ह्मणति पाहून ॥
वाजीगुहेंत गेला नलगे दुसरें प्रमाण याहून ॥४३॥
जाउनिगुहेंत पाहति हयआहे बद्ध कमलनालांनीं[५] ॥
ध्यानस्थएकमुनिही पूरित यद्देह अक्षमालांनीं[६] ॥४४॥
मुनिकैंचाचोरचिहा ह्मणुनितयामारिती तडकसारे ॥
होतांसमाधिनाशन कोपमुनीलानयेइलकसारे ॥४५॥
टाकुनिसमाधितेणें नयनांहीं पाहतांचि तद्वदना ॥
सर्वहिदग्धजहाले हरनेत्रें जाळिलें जसें मदना ॥४६॥
जळलेसागरपाहुनि विवरद्वारांतसैन्यजेंहोतें ॥
येउनिसाकेत[७]पुरा वृत्त[८]नृपाकारणें कथी होतें ॥४७॥
ऐकुनिवृत्तसुं[९]दुःसह[१०] सहसा तो[११] भूपभूमिवरिपडला ॥
सुतशोकंकितिवदावा जाणेनरएक ज्यासिं तो[१२]घडला॥४८॥
उठवितिवाराघालुनि शिंपुनिशीतांबु लोकें[१३]पाळाला ॥
आलेंकसेंनृपह्मणे सुतमरणश्रवणहोकपाळाला ॥४९॥
कोणींगुहेंतकेला स्वसुतांचा दग्धकरुनियां नास ॥
धाडीशोधकराया असमंजसुतास अंशु[१४]मानास ॥५०॥

---

१ घोड्यास २ पूर्व आणि उत्तर यांच्या मधील दिशा ३ खळग्यास ४ सागरास ५ दांड्यानीं ६ रुद्राक्षमालांनीं ७ अयोध्या ८ वर्तमान ९ सुत मरण रूप १० ऐकण्यास कठिण ११ सगर १२ सुतशोक १३ राजाला. १४ अंशुमान्नामकराजाचा नातू

होतांपितामहाज्ञा तिकडेशोधासि अंशुमान्गेला ॥
समुदायपितृ[1]व्याचा मुनिकोपेंज्यागुहेमधेंमेला ॥५१॥
दिसतांगुहेंतहयमुनि भस्माचेराशिअंशुमानाला ॥
याऋषिशापेंसागर जळलेकेलेंदृढाऽनुमानाला ॥५२॥
ध्यानस्थात्यामुनिचे तेणेंधरिलेचिजाउनीचरण ॥
पाहेंह्मणेमुनींद्रा यादीनातूंचिअससिबा[2]शरण ॥५३॥
नेत्रेंउघडुनिपाहुनि मुनिबोलेसदयत्या[3]पदनतातें ॥
कळलेंतुजपाठविलें स्वसुतांचेंऐकुनी[4]कंदनतातें ॥५४॥
भस्मावशेषझाला कथितोंमीत्वत्पितृव्यवर्गकसा ॥
बहुदीनदिससिवत्सा वाटेउद्धतहिअससितूं[5]नतसा ॥५५॥
नेत्र[6]निमीलनकरुनी असतांमीकरितईश्वरजपासीं ॥
इंद्रेंचोरुनितुमचा हयनकळतबांधिलाचि मजपासीं ॥५६॥
मागुनिसागर आले हयमाझ्याआश्रमीं बघुनि त्यांहीं॥
तच्चोरमीचजाणुनि केलें ताडन मला मुला पाहीं ॥५७॥
बहुव[7]त्सरतपकेलें नयनींतत्तेज सांचलें होतें ॥
नेत्रेंउघडुनिपाहूं गेलों तों दग्ध जाहले होतें ॥५८॥
माझेमनांत नव्हतें परिघडलें वदुनिकाय आतांतें ॥
जावें तुवांकथावें वृत्त असें हें त्वदीय तातातें ॥५९॥

---

१ चुलत्याचा २ रक्षण ३ पायांवर पडलेल्यातें ४ वध ५ चुलत्यासारखा ६ डोळे झांकणें ७ वर्ष ८ तुझेपितर.

पित्रुद्धरण कराया एकाद्या सांगगा उपायातें ॥
प्रार्थी मुनीस नृपसुत कीं आह्मीं याचिगाऊं पायातें॥६०॥
वदलादयालुऋषितो ऐकुनियां दीन बोल बालाचे ॥
स्वर्णद्योघाप्लुत[2]हे[3] होतिल तरिभयपुन्हां न कालाचें[4] ॥६१॥
पुसतांनाममुनिकथी कपिल असें ह्मणतिलोक यादेहा ॥
निघतांवंदुनिमुनिनृप मुखिसाधु[5]वियोगवर्ण या देहा॥६२॥
न्यावाह्मणतां कपिलें हयघेउनि अंशुमान्गृहागेला ॥
अवशिष्टकृत्यसारुनि ऋषिनीं तत्स[6]र्वहि शेवटा नेला॥६३॥
पौत्रमुखेंस्वसुतनिधन[7] परिसुनि निर्विण्ण[8] जाहलासगर ॥
सोडुनिगेलास्थापुनि राज्यभरा अंशुमच्छिरींनगर॥६४॥
सागर[9] वसनाभूमिस भोगुनियां नृपतिबहुत वत्सरेतां[10]
आतांह्मणेतरुणहा ईं[11]जसह मत्सुतादिलीपवत्स रेंतो[12] ॥६५॥
राज्यांतुनिकाढुनियां पित्रुद्धारार्थलाविलेंचित्त ॥
गेलाचितपकराया सर्वहिअर्पूनिसुतकरींवित्त ॥६६॥
केलेंखर[13]तरतपपरि देव[14]नदीचाप्रसादनचघडला ॥
कींतत्प्राप्तिनहोतां राजातोकाल[15]वदनिंसांपडला ॥६७॥

---

१ पितरांचा उद्धार २ स्व—नदी—ओघ—आप्लुत—गंगेच्या ओघानें स्नान घातलेले ३ सागर ४ यमाचे ५ साधुवियोग जोतो मुनिमुखीं या अशा वर्णातें आणि नृपमुखीं हा अशा वर्णातें देता झाला ह्मणजे अंशुमाननिघतांना कपिलमुनि या असें ह्मणाला आणि अंशुमान्मुनिवियोगखेदानें हा असें ह्मणाला ६ अश्वमेध ७ मरण ८ उदासीन ९ सागरसह १० अंशुमान् ११ भूमीसह १२रममाण होवो. १३खडतर १४गंगेचा १५ मृत्युमुखीं



तत्पुत्रेंहिदिलीपें टाकुनिराज्यातपःपथावरिलें ॥
गंगाप्राप्तिनहोतां याचेहीप्राणअंतकेंहरिले ॥६८॥
तत्पुत्रभगीरथजो तोनंतरनृपतिसर्वलोकाला ॥
झालातेविंअतिप्रिय सूर्याचाउदयजेविंकोकाला ॥६९॥
अप्राप्ततपःफलपरि करितांसत्कर्मबापआजोबा ॥
काळेंगिळिलेंयास्तव तेंचिकरुनिनातुहाहिसाजोबा ॥७०॥
ऐसानिश्चयकरुनी स्वसुताश्रुतसंज्ञकाकरुनिराजा ॥
गेलासिद्धकराया स्वपूर्वजांगीकृतामहाकाजा ॥७१॥
इछितहेंचिजयाचें होउनिगंगाप्रसादभाजनहा ॥
केव्हांह्मणेलपितरां कींयागंगाजलांतआजनहा ॥७२॥
आचरिलेंतीव्रतपा केवळभक्षूनिशुष्कपर्णातें ॥
नंतरतेंहीटाकी प्राशीतोस्वल्पमात्र अर्णातें ॥७३॥
धरुनीअनशननियमा स्वांगुष्ठाग्रींचमगउभाराहे ॥
तच्चित्तींहेंचिवसे व्यर्थकझालानृवपुकुंभाराहें ॥७४॥
देइनदर्शननजरी हाहीमरतोचिजाणुनीगंगें ॥
येउनियांस्त्रीरूपें स्वकरेंस्पर्शूनिनृपतिचींअंगें ॥७५॥
बोलसिनयनेंउघडी तीमीतूंजीसचिंतिसिमनांत ॥
आलेंप्रसन्नहोउनि तुझियाभावेंचिदुर्गमवनांत ॥७६॥

---

१ चक्रवाकपक्षी त्याला सूर्य फार प्रिय आहे २ भगीरथसुत ३ पात्र ४ स्नानकरा ५ उदकातें ६ अभक्षण ७ देह ८ पृथ्वी ९ कठिण.

त्वत्तपसफलचिझालें श्रमउंनकोव्यर्थबास्वकायास ॥
इछितमागेंआतां आहेंमीसिद्धतूजद्यायास ॥७७॥
श्रवणकरोनिस्वद्वच उघडुनिनेत्रांसिनृपतिजोंपाहे ॥
स्त्रीरूपधरुनिगंगा साक्षाज्जगदंबिकाउभीआहे ॥७८॥
स्तवितांभूपेंद्याया जीवितवजलसुधासुवृष्टीनें ॥
त्यांजेमेलेहोते तत्पूर्वजकपिलकोपदृष्टीनें ॥७९॥
येतेंमीपरिकोणी आणींमत्पतनवेगसाहेल ॥
नातरिमदोघबलिच्या संद्मीगेल्याविनानराहेल ॥८०॥
एवंवदोनिमाते गंगेहोवोनिगुप्तगेलीस ॥
मेर्वाद्रिवरिकिराया सत्वरअमरीसहीतकेलीस ॥८१॥
हेंऐकुनिनृपगेला प्रार्थायाआशुतोषदेवास ॥
झालाप्रसन्नभगवान् तोस्वकपर्दीचतूजदेवांस ॥८२॥
पाहुनिसुस्थलकेला वासश्रीशंभुमस्तकावरितां ॥
तंवजलपुढेंननिघता राजाचाहोय सर्व आंव रिता ॥८३॥
विश्रामकरुनिथोडा तूंनिघतीजाहलीसयायास ॥
तेव्हांनृपासिवाटे अपुलाझालावृथानआयास ॥८४॥

हिमालया वरील गंगेचे वर्णन.

वेगेंमहदानंदें आलिसमगनीटहिमगिरीवरती ॥

---

१ तुझेंवचन २ जीवंतकराया ३ अमृत ४ पाताळीं ५ मेरुपर्वत ६ देवस्त्रिया ७ कीडेस ८ सदाशिव ९ सदाशिवाचा जटाजूट १० स्थान ११ त्वां, असे प्रयोग मोरोपंताचे अढळतात म्हणून आह्मी दिला आहे १२ धैर्य १३ हिमालय.

सांगायाकींत्याला झालेंतवजांवयासि मी वैरती ॥८५॥
पूर्वीचपार्वतीचा जनकजहाला असे हिमालयहा ॥
गंगेतुझाहिआतां येतांत्यावरितवौघ अघभयहा ॥८६॥

हिमालय वर्णन.

सुंदरहेंस्थलअपुल्या ठायीं भूतीलसर्वरसनेतें ॥
ज्याचेंवर्णनकरितां होऊंद्यावानगर्व रसनेतें ॥८७॥
ज्यावरिसततपडेहिम यॆच्छकलेंभासताति जेविं हिरे ॥
देतांप्रकाशअधिकचि शोभेतेंपावतातिहो मिहिरें ॥८८॥
रविकिरणपातहोतां प्रतिशिखरीं दीसतातिबहुतरवी ॥
आहेहिममय भूमी प्रतिबिंबातेंह्मणोनिबहुतरवी ॥८९॥
हिमशैलशुभ्रशिखरां वरिनिश्चलसर्वदाहिघनमाला ॥
राहेपाहेकौतुक ऐरावतकेंविंखालताआला ॥९०॥
स्वर्गद्वारअसेजो जोंआहेबहुमहर्षिचेंवेतन ॥
श्वशुरहिसदाशिवाचा कन्यात्वेंपार्वतीसकरिजतन ॥९१॥
ज्यावरिआकाशांतुनि हिमशकलेंपडतिकींजशागारा ॥
भवतापतप्तमानव वसतिजिथेंटाकुनीनिजागारा ॥९२॥
भूवरिअसानभूधर ज्याचींयोजनमितेंमहाशिखरें ॥
असतींउन्नतलटिकें वाटेपरिजाशितारिपहाशिखरें ॥९३॥

---

१ पार्वती हिमालयाची कन्या त्या संबंधानें सदाशिव हिमालयचे जामात २ वरणारी ३ पापभय नाशकर्ता ४ हिमालय ५ भूमींतील ६ आणितें ७ जिव्हेतें ८ ज्या हिमाचे तुकडे ९ सूर्यानें १० उत्पन्न करी ११ मेघसमुदाय १२ हिमालय १३ अति प्रियकर स्थल १४ संसारतापानें संतप्त १५ आपुलीं घरें १६ पर्वत १७ उंच.

जवळचियाच्यादुसरेंशिखरअसेह्मणतिज्याशिं[1]गिरिधवल॥
नवलनकोणाहोइल गेलेमेघांकराव[2]याकवल ॥९४॥
अतिशीतशुक्लज्यावरि वाहतिवारिप्रवाहचोंहिकडे ॥
जाणोमुक्ताहारा घालितिकंठींहिमाद्रिचेहिकडे ॥९५॥
जैसापर्वतमोठा तैसेंत्याचेंअरण्यहीमोठें ॥
छायासर्वत्रदिसे दिसतोसूर्यप्रकाशनचकोठें ॥९६॥
यद्यप्यकृ[3]त्रिमचितें वनपरिलोकांसिपाहुनी चित्रं[4] ॥
वाटेह्मणतीस्वकरें रेखुनिलिहिलेंपिता[5]महेंचित्र[6] ॥९७॥
ईशविनिर्मितजितुकें आहेपृथ्वींतसर्वतरुजात[7] ॥
कितिसांगूंत्यांतुनियां असतीकींबहुतनिश्चयेंज्यांत ॥९८॥
असतिबहुतअ[9]खातहि त्यां[10]माजीपूर्णजींजलेंअमलें[11] ॥
वेष्टितबकादिकांनीं फुललींतैशींचतज्जलींकमलें ॥९९॥
घनविरलरम्यरुक्षा देशातेंदृक्षजेथदाखविती ॥
त्यांवरिकरोनिघरटीं निर्भयपिल्लांसिपक्षिलाखविती॥१००॥
सिंव्हव्याघ्रगजादि क्रूरपशूचेथवेबहुतअसती ॥
ज्यांचीनव्हेनवीना आहेतेथेंपुरातनीवसती ॥१०१॥
हरिगर्जित[12]करिबृं[13]हित कोठेंघूत्[14]कारघोरघूकांचे[15] ॥
घूत्[16]करणवराहांचें तैसेंफूत्[17]करणदंदशूकांचें[18] ॥२॥

१ धवलगिरीनामक २ ग्रास ३ न केलेले ४ आश्चर्य ५ ब्रह्मदेवानें ६ बागेची तसवीर ७ वृक्ष जाती ८ ज्या अरण्यांत ९ आपोआप झालेलीं तळीं १० वनामध्यें ११ स्वच्छ १२ हरि–गर्जित, सिंव्हांचाशब्द १३ करि–बृंहित, हतींचा शद्ब १४ घुबडांचाशब्द १५ घुबड १६ डुकरांचा शब्द १७ सर्पांचा शद्ब १८ सर्प.



श्रवणींयेतांकांपति अंतःकरणांतशूरहिभयानें ॥
दुसरीकडेसतेथुनि जायापळतीचेतमगरयानें ॥३॥
तोंतचित्तारमविति सुंदरकेकाध्वनीमयूरांचे ॥
सुस्वरशब्दपिकांचे कोठेंगुंजारवहिमधुकरांचे ॥४॥
अनिलेंहलतीवेली हलविति अपुलेशिरासहीताल ॥
त्यानृत्यातेंशिकती जाणोतेवृक्षदावितीताल ॥५॥
अन्योन्यघर्षणोत्थें अनलेंस्वकुलासिजाळितांवंश ॥
कथितीकलहाकरितरि पावेनाशाअसाचिनरवंश ॥६॥
असतीकोठेंकोठें मोठेअत्युच्चपुष्पितपलाश ॥
दिसतीदुरोनिजैसे रक्तानेंनाहलेबहुपलाश ॥७॥
मृगनाभिगंधवासित-पाषाणावरिमहाभुजगफिरती ॥
जिकडेतिकडेअपुल्या वदनांतिलउग्रगरलतेकिरती ॥८॥
पाहुनिदुरोनित्यांवरि मधुभ्रमेंबैसतांभ्रमरमरती ॥
चित्तींकरानिदर्शन योग्यनसहसाकुठेंहिपरमरती ॥९॥
फिरतीकरेणुमागें मदलुब्धभ्रमरनिकरकरट करी ॥
खरतरपरस्परातें देतीवदनींधरोनिकर टकरी ॥१०॥
जेथेंसिंहहिअसती ज्यांचींअतितीक्ष्णपाहतांनखरें ॥
मंदपदन्यासादिक मदमत्तगजानसूचतीनखरे ॥११॥

---

१वेगानें २ताल्वृक्ष ३परस्पर घर्षणापासून उत्पन्न ४आग्नि ५ वेळू ६ राक्षस ७ सुवासित ८ उदाहरण ९ प्रीति १० नखें.

हिमालयावर भिल्लांची शिकार.

अतिदुष्टशबरकरिती संततयापर्वतावरीमृगया ॥
हाचिस्वधर्मसुखकर इतरातेंह्मणतितेअशीनगया ॥१२
शरलागतांशरीरीं व्याकुलहोवोनिमृगवनींदडती ॥
पळतांमार्गीज्यांच्या आंगांतुनिरक्तबिंदुहीपडती ॥१३॥
शों[1]णितचिन्हितमार्गें जाउनितेदुष्ट त्यामृगांधरिती ॥
हरितीप्राणकुकर्में एवंविधउदर आपुलें भरिती ॥१४॥
प्रतिकूलकालयेतां हितअसतेंतेंचिअहितवाहोतें ॥
मृगवधकारणझालें जेंकेवलजीवरुधिरकींहोतें ॥१५॥
व्याघ्रामागेंलुब्धक घेउनिशरचापत्यांवधायाला ॥
जातीपरंतुअसतां कंदरतेकोठुनीबधायाला ॥१६॥
उठविततरुस्थकपिला व्याघ्रनदिसतांवनांताभिल्लांतें ॥
कींते [2] त्यां[3]सिपहातां ओरडतीधरितिघट्टापिल्लांतें ॥१७॥
शब्दस्थानींजाउनि तरुणशबरह्मणतितेगुहेमाजी ॥
गेलकायकरावें वृद्धह्मणेयुक्तिऐकहेमाजी ॥१८॥
नदिसेशरीरयद्यपि तिमिरीं[4]हीचमकतातितेंनेत्रें[5] ॥
त्यांतेंलक्षुनितीक्ष्णें बाणेंहाणाचिभेदुनीगात्रें ॥१९॥
ऐकुनिहेंवृद्धपदीं आनंदेंशबर[6]मंडळीलोळे ॥
वृद्धह्मणेघेतोंयश कायकरूंमंदजाहलेडोळे ॥२०॥

---

१ रक्त २ वानर ३ वाघांस ४ अंधकारीं ५ वाघाचेडोळे ६ भिल्ल.



राहूनिदरीद्वारीं व्याघ्राच्याखरशरेंवधाकरुन ॥
येती आनंदानें अपुल्यासदनामहद्यशावरुन ॥२१॥
वनगोपुच्छसुकेशें पुष्टकरायासि आपुल्याकबरी ॥
गोवधकरावयाला स्वपतीतेंप्रार्थिती तिथेंशबरी ॥२२॥
स्ववधोद्यतपाहुनित्यां त्यांपळतीकंदरींलपायाला ॥
तेथेंसिंहपहातां कंपनकैसासुटेलपायाला ॥२३॥
नवधावधाचिधेनुस कथितिदयातत्प्रियाहित्यांसितदा॥
दोघींहितुष्टहोती कापितिगोपुच्छगुच्छशबरयदा ॥२४॥
जनहोगोवधनिर्दय शबरस्वांतींहिदेयि अनुकंपा ॥
मगकैसीइतरांची पावावीतद्वधींनतनुकंपा ॥२५॥
जलपानकरायामृग येतीदुसरेपरंतुतेचिसरीं ॥
व्याघ्रापाहुनिपळती युक्ततयाचीकुणानयेचिसरी ॥२६॥
तेथंदडोनिरात्रीं बैसातितेशबर बांधुनीमाळा ॥
येतांव्याघ्रशरानें मारुनितत्प्राण आर्पितीकाळा ॥२७॥
लाघवशबरकराचें औद्धत्यहिसूकरांगिचेंतैसें ॥
मृगयाकुशलजनांही विस्मयभीतीसतें नदेकैसें ॥२८॥
धांवातिकेशउभारुनि ओंकितिकोपोनिघासजेगिळिले ॥
नेणतिपरिशबरशरें वृक्षींदेहासि आपुल्याखिळिलें ॥२९॥
मारितितेउग्रांतें नचदीनांतेंह्मणूनकाचिअसें ॥

---

१ वनगाई २ बुचडा ३ भिल्लांस ४ वनगाई ५ झुपका ६ चित्तीं ७ सरोवरीं ८ गवत.

वधितातिमत्स्यकच्छपबकलावकनीलकंठहरिणससे॥३०॥
ऐसेहीधन्यचिंते कींमिळतेंगांगजलयथेष्टतयां ॥
पानस्नानकराया तेंणेंतत्पापपावतेंविलया ॥३१॥

हिमालयावर गंगाप्रवाहाचा चमत्कार.

ऐशात्याअद्रिवरी वाहतअसतांप्रवाहतवगंगे ॥
दिसातिचमत्कृतिनाना ज्यांतेंपाहूनिलोकबहुरंगे ॥३२॥
वसतिसितातूंहिसिता वस्त्रहिसितनक्रयानतेंहिसित ॥
चंद्रादिभूषणेंसित पतिहिसितचित्यांतलाविसितभंसित३३
सितसत्वगुणाश्रयतूं भक्तांत्वद्भजनिंम्हणुनिथोरहित ॥
त्वत्समदैवतदुसरें नाहींऐसेंरजेंस्तमोरहित ॥३४॥
शीतश्वेतगुणेंहा गिरिकींतूंअधिकहेंनकोचितुला ॥
उसणेंअणिलेंयेणें गुणजेहेअसतिपूर्णसहजतुला ॥३५॥
मृगगणपाहुनिजैसा जाउनियांलपतत्यासिसिंहधरी ॥
निबिडवनांतुनिजातां पापेंमृगगमतिमजतवौघहरी ॥३६॥
लपुंनिवनींजायाचा कथिलाम्यांपरिखरानहाहेतू ॥
पापेंलघुतन्नाशा प्रकटपणेंलाजसीअहाहेतूं ॥३७॥
होउनितृप्तचमरमृग तवजलपानेंउभारितीपुच्छ ॥
चामरधारीआपण मानितिअन्यानृपांसितेतुच्छ ॥३८॥
न्हातींगंधर्वमृगहि तवजालिंपरितन्मदानल्यालीस ॥

१ भस्म २ रजोगुण, तमोगुण विरहित ३ तुलना ४ यापर्वतानें. ५ ज्यांच्या केसांची चवरीकरितात ते मृग ५ कस्तूरीमृग.

मातेशंकितहोइल पतिसागरह्मणुनिकायभ्यालीस॥३९॥
मलयानिलेंहलेजल तेणेंउठतीतुझ्यावरी लहरी ॥
ज्यांचेंनर्तनसांगा कवणाच्या मानसासिं हो न हरी ॥४०॥
मोरस्वपिच्छधरिती दावायानृत्यकरुनि आ वरती ॥
परितत्साम्यनहोतांलाजुनिरडतचितयांसिआवरती॥४१॥
राहोभाग्यनराचें तुझियाकथवेनतीरगततरुचें ॥
यत्पादपरिक्षालन देवनदीलातुलाहिसततरुचे ॥४२॥

हिमालयापासून गंगेचें खालीं येणें.

होतांहिमशिखराहुनि भूगततवशुद्धपांथवेगानें ॥
स्तवितीअत्यानंदें तुजसुजनांचेचिबहुथवेगानें ॥४३॥
बुडतांजळींजनातें देतीस्वकराजसेतटस्थनर ॥
भवभग्ननरांदेसी अद्रितटावरुनि ओघरूपकर ॥४४॥
होतांपतनजलाचें धोंधोंतेंवाजतें जशीभेरी ॥
ऐकुनिशब्दतयाचा त्रिविधमहापातकांसियेघेरी ॥४५॥

समुद्रास मिळण्याकरितां गंगाकशी आणि कोणच्या मार्गानें गेली.

पतिसंगमार्थकवण्या मार्गेंगेलिसहिमालयाहून ॥
वर्णूतेंचियथामति व्हायाप्रमुदित रसज्ञ पाहून ॥४६॥
जातां सवत पतिकडे बघणें तोंदूर परि परिसतीला ॥
वाटेमृत्युहिउत्तम दुःशीलेलानव्हेपरि सतीला ॥४७॥

---

१ तोंडपसरून, नाचतेवेळीं मोर तोंड पसारतात २ पिसाऱ्यास ३ उदक ४ नौबत.
५ समुद्रसंगमार्थ ६ श्रवण करणारीला ७ वाईट स्वभावाच्या स्त्रीला ८ पतिव्रतेला.

समुदायसपत्नींचा घेउनितूंपतिकडेसजायास ॥

निघसीदाविसिसत्पथ हाचिअसेक्रोधकुपथजायांस॥४८

गंगोत्री.

नंतरआलिसतेथें स्थलजेंनामें प्रसिद्ध गंगोत्री ॥

स्नानेंजिथेंसपूर्वज पावति निर्वर्णनीयशंगो त्री ॥४९॥

नसतीदुजींपरंतू असतीझाडेंअनेकचेळांचीं ॥

छायादिनसेजरितरि ज्यांचेआंगींसमृद्धितेलाची ॥५०॥

पात्रस्वल्पचितूझें येथेंपरिजें समस्तशुभपात्र ॥

नात्रस्नानान्मुक्तो भवतिऋषिहिकथितिसंशयोनात्र ॥५१

हिमालय सोडल्यामुळें गंगेस दुःख होतें.

निघतांयेथुनिगंगे थोडीमागेंपुन्हामुरडतीस ॥

नोहेजलअश्रुचिहें जनकवियोगेंचिकायरडतीस ॥५२॥

युक्तचिहेंकींकन्या माहेराहूनि सासऱ्यांजातां ॥

रडतीमागेंनिरखिति, येत्येंह्मणतीपुनःपुनःताता ॥५३॥

जन्हुऋषीच्या आश्रमाकडे प्रवाह जातो.

राजर्षिजन्हुनामा होतातपकरितबैसलाजिकडे ॥

गेलाप्रवाहतूझा मोठ्यावेगेंकरूनियांतिकडे ॥५४॥

येउनितेथेंजेव्हां आश्रमत्याचातुवांबुडविलास ॥

स्वतपाचादावियला तेणेंनचहलवितांबुडविलास ॥५५॥

---

१सवतीचा-इतरनद्यांचा २नवऱ्याकडेस-समुद्राकडेस ३ चांगला मार्ग ४ वाईट मार्ग ५ स्त्रियां ६ पूर्वजासहित ७ वर्णनास अशक्य ८ कल्याण ९ कुलोत्पन्न १० वृक्षविशेष ११ कल्याणांनीं भरलेलें भांडें १२ पुरुष १३ यातीर्थी १४ याविषयी १५आसन १६ पराक्रम



राजर्षिप्रवरतुझ्या ओघाक्रोधेंकरूनियांप्याला ॥
तोतद्दक्षिणकर्णा पासुनिबाहेरेपुनरपिनिघाला ॥५६॥
वैशाखशुक्लपक्षीं सप्तमदिवसींचसर्वहेंघडलें ॥
गंगोत्पत्तिदिवसहा यास्तवऐसेंचिनामयापडलें॥५७॥
होतांप्रकटाहितेथुनि जनतुजलाजन्हुकन्यकाह्मणती ॥
नेणुनिदेवामर्त्या विपरीतचिजन्य[1]जनक[2]हेगणती ॥५८॥
कोठेंपामर[3]जन्हू कोठेंतूंअमरनिम्नगावरिल[4] ॥
कैसातोबापतुझा कैसातोतूजगुप्तहीकरिल ॥५९॥
करिसीअनंतलीला भक्तमनोरथकरावयापूर्ण ॥
कन्याकायस्त्रीही भक्तेच्छाबघुनि जाहलिसतूर्ण ॥६०॥

गंगा शंतनुराजाची स्त्री झाली.

अप्रासंगिकयद्यपि मधुरह्मणुनिठेवितोंपियायास ॥
थोडेंसेंचकथामृत तेणेंहोतिलजनान आयास[5] ॥६१॥
श्रीमद्वेदव्यासें कथिलें जें भारतादिपर्वांत ॥
ब्रह्मसभेंतमहाभिष राजाहोतासुमान्यसर्वांत ॥६२॥
येतांतेथेंगंगा वायूनेंउडविलेंतिचेंवस्त्र ॥
दिसतां अंग अनंगहि नृपचित्तींरोंविआपुलेंशस्त्र ॥६३॥
धातान्ह्मणेनृपाजा विषयीपुरुषा नलोकहायोग्य ॥
मध्यमलोकींचनरां होतें अवघेंहिवस्तुउपभोग्य ॥६४॥

---

१ पुत्र २ बाप ३ हलका ४ स्वर्गांतील ५ जन्ममरणरूप आयास.

ऐसाशापनृपाला झाला,तैसाचि अष्टवसुलाही ॥
शापीवसिष्ठ,वसुकृत रीढेनें जाहलें तैदसुलाही ॥ ६५॥
टाकुनिकोपह्मणेद्विज त्यांहींनानाविधस्तुतीगातां ॥
जाउनिमनुष्यलोकीं बहुनाहींएकजन्मघ्याआतां ॥६६॥
प्रार्थितिगंगेतें ते अमुचीअन्यान तूंचिहोमाता ॥
उदरींघेबहुनअह्मीं तवजठरींसर्वलोकहीमाता ॥६७॥
पुरवायाकामातें झालीस्त्रीत्यांहिमहितराजाची ॥
माताहित्यावसूंची होतीइछाचिअतितराज्यांची ॥६८॥
प्रसवेतीत्यापुत्रा ह्मणतीगुणगणकरंडज्याभीष्म ॥
रिपुनृपगणांसियुद्धीं अटवीउदकासरींजसाग्रीष्म ॥६९॥
आगंतुकासिसाडुनि मच्चित्तप्रकृतवर्णनीं वळतें ॥
इतुक्यानेंगंगेचें भक्तीवात्सल्यपूर्णहेंकळतें ॥७०॥

केदारेश्वर.

तेथुनिमातेतुजला दिसतोश्रीशंभुदेवकेदार ॥
ऋतुलांगलपर्जन्या वांचुनिजेंमुक्तिफलदकेदार ॥७१॥
जातांमार्गींइकडे यात्रिकजन बहुतसोशितीकष्ट ॥
लुटतीचोरव्याघ्रहि भक्षितिहोतीकितीकअहिदंष्ट ॥७२॥
खोरेखोलभयंकर यास्तवजायासिबांधितीशिंकीं ॥
हाएकपणाचिआहे यांतुनिजाईलतोयमाजिंकी ॥७३॥

---

१ वसूनींकेलेल्या २ अपमानानें ३ वसिष्ठाचे प्राण ४ संतापलें ५ मावतां ६ महाभिषरा जाची ७ पूज्य ८ वसूंची. ९ शेत १० सर्पानें चावलेले.



जाउनितिथवरकोणी होउनिभयभीतकांपवित्तिकंठ ॥
धाडसह्मणतीगेल्या वांचुनिभेटेलकेविंशितिकंठ ॥७४॥
बैसुनिजातांत्यांतुनि नेत्रेंभ्रमतीनरादिसेनतळ ॥
कायवदूंजरिशिंकें तुटलेंतरिमरणलागतांनपळ ॥७५॥
होतीदुःखेंज्यांचीं होऊंनशकेकदापिहीगणिती ॥
देवाधिदेवतोही होईलश्रीगणेशजरिगेणिती ॥७६॥
ऐसेहिकष्टभोगुनि जातीजनदर्शनासिदेवाच्या ॥
ह्मणतीतारींमारीं परितवपदसन्निधानदेवांचा ॥७७॥
मार्गीमोठें आहे गौरीवदनासमीपचिउन्हाळें ॥
परिमितचिउष्णउदकेंपथिकसुखेंहोतिज्यामध्येंन्हालें ॥७८॥
स्वर्गारोहकराया हेंचिस्थलहोयभव्यनिश्रेणी ॥
ब्रह्मर्षिराजऋषिंच्या गेल्याइजवरुनिहोबहुश्रेणी ॥७९॥
देहाटाकितितेज्यां वाटेसंसारवांचिकपसारा ॥
होतोयत्स्वीकारें आयुष्याचा फुकांचि खर्च सारा ॥८०॥
मरतांचितेअसतिजे उर्वश्यधरामृतासि तान्हेले ॥
स्वर्गींसुरदूतांहीं त्यांतेंतेथोनिपाहतां न्हेले ॥८१॥
स्वर्गनसेकांमरतां कथितांहिंनास्तिकेंहि आधुनिकें ॥
बोलनऐकावेते ह्मणतीतेज्ञस्वकर्मसाधुनिकें ॥८२॥

---

१ महादेव २ जोशी ३ वाणीनें ४ स्थलविशेष ५ पर्वतामध्यें भूमींतून साहजिक उष्ण उदक निघतेंतें ६ मार्गस्थ. ७ शिडी ८ समुदाय ९ उमांस १० तोंडचाखोटा ११ व्यर्थ १२ खर्च १३ उर्वशीनामक अप्सरेच्या ओष्ठसंबंधीं अमृतास १४ अलीकडील १५ जाणते.

इंद्रपुरीसमसदना टाकुनिधर्मादिनृपतिजेगेले ॥
तेकांमूर्खह्मणावे कींतेयेथेंचिगळुनियांमेले ॥८३॥
येथेंशरीरगळतें परिहोतेंदिव्य,कामंमात्र,गळे ॥
जैसेंसुवर्णजळतां पहिल्याहुनिहोयशुद्धमलचिजळे ॥८४॥
गंगेतुजलायेथें जनह्मणतिसरस्वतीअलकनंदा ॥
राहोस्नानहिज्यांचें स्मरणचिदेतेंमनासिआनंदा ॥८५॥

बदरिकाश्रम.

अघशमनीआपतुझ्या इकडुनियांबदरिकाश्रमा वळती ॥
यद्दर्शनेंनरांचे घोरतरत्रिविधतापमावळती ॥८६॥
येथेंनरनारायण स्वार्थार्थनव्हेपरार्थजे तपती ॥
दीनांचेसंरक्षक ऐसेनसतीचअन्यजेथ पती ॥८७॥
आहेकींकिंकरतो ज्यांचासर्वामरांसहितखंपती ॥
नीचोच्चहिभक्तांचें, ते प्रभुचिकरावयास हित खपती ॥८८॥
ब्रह्मकपाटींदेती पित्रुद्देशेंकरूनिपिंडास ॥
जेतेसुपुत्रअक्षय तृप्तकरितिआपुल्यासपिंडांस ॥८९॥
श्राद्धचिकरणेंनलगे येथेंकर्त्यानरासिपुनरपित्या ॥
कींतोमुक्तचिकरितो राहोसुतसुनरवाहि कुनर पित्या ॥९०॥

हरिद्वार.

नारायणाश्रमाहुनि ओघतुझापावलाहरिद्वारीं ॥
वृक्षांतुनियांजातां स्वच्छहिदिसतेंतुझेंहरिद्वारीं ॥९१॥

१ कामादिमनोविकार २ इंद्र ३ हिरवें ४ उदक.

बहुविधउत्सवकरिती मिळतेतेथेंअसंख्ययात्राही ॥
तारिसिसर्वांतेंतूं विनवितसेदीनह्मणुनियात्राही ॥९२॥
कनखलतीर्थहिआहे परिकृतसुकृतेंतरासिअसुगमजें ॥
पाहुनियमदूतांचें येतेंतेथिलजनांसिहसुं गमजे ॥९३॥
प्रतिवर्षींजनयेथें येतीस्नानासिचैत्रशुद्धांत ॥
किल्बिषधुवोनिकरिती तुझियाउदकेंकरूनिशुद्धांत ॥९४॥

कुंभाचा मेळा.

घटराशिगगुरुहोतां येईजनवृंदतेंनवर्णवतें ॥
स्वस्त्रीदर्शनकामुक लोकमिषेंयेतिकायअर्णवतें ॥९५॥
खेळतिजिवितिबैसाति निजतीअवघ्याप्रजातुझ्यापुलिनीं ॥
युक्तचिमात्रुत्संगीं लोळावेंबहुदिसांअल्यामुलिनीं ॥९६॥
रवितापेंहिमविघरे तेणेंतुजपूरयेनिदाघांत ॥
वाहतिपरिमुक्तचिते होतीहीवोअसासदाघात ॥९७॥
मार्गीबैसातिलूले पांगेअंधहितसेबहुतकुष्ठी ॥
त्यांत्यांतेंतेंइछित देउनियांजनउदारदेतुष्टी ॥९८॥
आणितिविकावयाला गजगाईव्याघ्रउष्ट्रहीघोडे ॥
देउनिमूल्याघेती ह्मणतीयांच्यागुणासिहेंथोडें ॥९९॥
पाषाणांतुनिजातां थडकुनियांविमलजलतुझेंउडतें ॥
अवलोकित्याजनांच्या अवघ्यापापांकुरासिजेंखुडतें।२००।
येथुनितुझेंयथाक्रम टाकुनिअल्पत्वपात्रहेंवाढे ॥

१ मला २ चाळे.

उदरींघेणेंआहे जनपापाचेसमूहबहुगाढे ॥२०१॥
होतेंतेथुनिकोठें वक्राकोठेंतुझीगतीसरला ॥
जातिसत्यादेशाचा तत्कालक्लेशसर्वहीसरला ॥२॥

हस्तिनापुरी.

गंगादक्षिणतीरीं होतीकींहस्तिनाह्मणूनपुरी ॥
देतीअमरावतिची उपमापरिहीअह्मींह्मणूंनपुरी ॥३॥
श्रीसोमवंशनिर्गत नृपमौक्तिकजाहलेजिचेभर्ते ॥
जेगोद्विजप्रजेच्या दुःखांचेहोतसर्वथाहर्ते ॥४॥
विधुवंशविमलमुक्ता[1] मालागततारभूतनृपकथितो ॥
कींयन्नामोच्चारहि लोकांच्यापापराशितेंमथितो ॥५॥
दुष्यंतभरतपांडु श्रीभीष्मययातिपंचपांडवही ॥
विमलेंयशेंजयांचीं लिहितांभर[2]लीचसत्यपांडवही ॥६॥
यासत्कुलींनदुसरा दुष्टपरीतोसुयोधनचिएक ॥
लावायाकूटस्था लांछनवंशींनकोतबहुलेंक ॥७॥
अथवाविधुवंशसुवर[3] जायवरायासिकीर्तिनवरीला ॥
दृष्टिनव्हावीह्मणवुनि गल्लमषि[4]मिषेंसुयोधनवरीला ॥८॥
लिहिलेंजरीहिभारत विस्तारेंतद्यशासह व्यासें ॥
तरिसंपलेंनजेंतें वर्णावेंम्यांकशास हव्यासें ॥९॥

---

१ उत्तम शुद्धमोतीं २ ब्रह्मांड ३ उत्तम नवरा ४ गालबोट विवाहसमयीं नवऱ्यास दृष्टि-होऊंनये ह्मणून लावितात.




होतीनगरीऐसें स्थलहेंपाहुनिकुणानवाटेल ॥
गाढविदिसेलरंभा जेव्हांवार्धक्यतीसगांठेल ॥१०॥
गंगाप्रवाहयेथुनि जातांयेथेंकशासमीहिबसूं ॥
टाकूंया या ग्रामा देहाजातांचिलोकजेविंअसू ॥११॥

गणमुक्तेश्वर नांवाचें क्षेत्र.

तेथुनिसमीपआहे श्रीगणमुक्तेश्वराभिधक्षेत्र ॥
दावाहेंचिनदुसरें ह्मणतिसदामानवासितन्नेत्र ॥१२॥
येथेंईशकृपेनें होयअसंख्यातजीवगणमुक्त ॥
यापुण्यक्षेत्रातें या सुगुणेंह्मणतिलोकगणमुक्त ॥१३॥
स्वामीत्रिलोकिचाजो नांदेयेथेंस्वयेंविनायकतो ॥
करुणास्वरदीनांचा ज्याऐसाअन्यकोणिनायकतो ॥१४॥
हेरंबाचेंमंदिर सुंदरआरामहीजिथेंआहे ॥
त्याचेसमीपगंगा स्वच्छेंउदकेंकरूनियांवाहे ॥१५॥
वाटेखालींआणिलें देवेंस्वानंदभुवननिजलोका ॥
जाऊंचलाह्मणतिजन टाकुनितेंस्थलउगेचिनिजलोका॥१६॥

तेथून पुढें जाणें.

मंदाकिनीहिदेवी निघतांयेथोनिमंदगतिझाली ॥
पाहुनिरमणीयस्थल येथेंताचित्तवृत्तिबहु धाली ॥१७॥
निःशब्दागंभीरा झालिसतैसीअनुक्रमेंशांता ॥
युक्तचिबाळपणींचें टाकितिचांचल्यकुलवतीकांता ॥१८॥

आक्रमुनिरामघाटी आलिसदेखावयास्थल[1] अनूप ॥
केवळनामेंचिनव्हे तुझियाउदकेंकरूनहिअनूप ॥१९॥
जेथेंमिळतिजनातें सुंदरकंबलविनिर्मितेंवस्त्रें ॥
शीतविनाशकराया ऐशींनसतीचहोदुजींशस्त्रें ॥२०॥

फर्काबाद शहराचें वर्णन.

फर्काबादहिआहे जवळचियाच्यादुजेंमहानगर ॥
नामकथींक्षेत्रनहें व्यापाराचेंचिहोयजेंआगर[3] ॥२१॥
आणितिविकावयाला यानगरींबहुतकाश्मिरीशाली ॥
कींअसतीलोकसुखी भक्षितिघृतसहितजेखिरीशाली[4]॥२२॥
तैसेंआणुनियांजन नानाजनपदसमुद्भवेंरत्नें ॥
लोडाटेंकुनिबसती पाहूंआल्यासिदावितीयत्नें ॥२३॥
मार्गसुविस्तृतजेथें तैसेनगरींचतुष्पथहिमोठे ॥
ज्यांच्यापुढेंसुशोभित असतिबसायासिघातलेओटे ॥२४॥
येतांहेमंतऋतू शीताधिक्येंकरूनिजलथिजतें ॥
जेथेंउष्णाधिक्यें वाटेग्रीष्मींशरीरहेंशिजतें ॥२५॥
ऐसेंशीतहिउष्णहि होतेंदेशांतह्याअसामान्य ॥
परिह्मणतीदेहसुखा देशनसेदूसराअसामान्य[5] ॥२६॥
ज्याच्यासमीपभूमी देतेसर्वप्रकारचेंधान्य ॥
तेथिलआम्रफळेंतों होतीबहुतांजनांसहीमान्य ॥२७॥

१ स्थलविशेष २ पानथळ ३ मुख्यस्थान ४ भात ५ देश.



भागीरथीतशांतहि शोभविल्येत्याबहुस्वर्गमनानें ॥
गंगास्तुतिप्रसंगीं वर्णावेंकांनयामगमनानें ॥२८॥
आहेसर्वत्रपरी मत्स्यांचीयास्थळींविपुळवसती ॥
जातांस्नानासिजना भक्ष्याच्याभ्रांतिनेंचिजेडसती ॥२९॥
ग्रामस्थदुष्टनरजे वधितीगंगाजलस्थमीनांतें ॥
मातागंगाअमुची यांचीहीहेंनजाणुनीनातें ॥३०॥

ब्रह्मावर्त क्षेत्राकडे गंगेचें निघणें.

हेंस्थलसोडुनिसत्वर माताभागीरथीपुढेंगेली ॥
क्रोधेंकरुनिनिघाली पाहुनिदीनस्वबालकेंमेलीं ॥३१॥
नंतरगेलिसतिकडे स्वल्पाहीजोधरीनदेशमला ॥
करुनीतपासिजेथें बहुऋषिसमुदायमनुवदेशमला ॥३२॥
ब्रह्मावर्तजयाचें नामअसेदेशजोसदाशुद्ध ॥
राहतिशांततपोधन जननसतीजेथघातुकक्रुध्द ॥३३॥
नाहींअरण्यपर्वत आहेसमभूमिह्मणुनिहोयजना ॥
दातास्वर्गाचाही शास्त्रींसमदेशउक्तहो,यजना ॥३४॥
गंभीरजलजलाशय याक्षेत्रींक्रोशमात्रपात्रअसे ॥
दोन्हीतटसिकतामय दिसतीरंगावलिप्रलिप्तजसे ॥३५॥

गंगेतील जलचरांची मौज.

गंगातीरींकच्छप येउनिउष्णांतशेकितीपाठ ॥

---

१ या पुरास २ पापा ३ मनु ऋषी ४ यज्ञास.

वाटेजनांसिकींहे असतिबसायासिघातलेपाट ॥३६॥
बैसतित्यावरितोंते धरितीगंगेंतजावयावाट ॥
कायहलेपाहुनियां जनह्मणतीकायजीवहेबांट ॥३७॥
फिरतीवरतीनौका तैशाअभ्यंतरींतुझ्यासुसरी ॥
तारायामाराया ऐसींनसतीचसाधनेंदुसरीं ॥३८॥
एकेदिवशींमाझें जाणेंभागीरथीतटींघडलें ॥
तेथेंएकमनोहर कौतुकदृष्टीसमाझियापडलें ॥३९॥
कांथितोंगंगादेवी आहेस्वाश्रितजनींकृपालुकशी ॥
पाहुनिसुतींह्मणावें अमुच्यासंरक्षणींअईचुकशी ॥४०॥
निद्राघ्यायातीरीं टाकितिमकरस्वदेहधोपट ते ॥
सिकताशय्यासुततें मातालहरीकरेंचिथोपटते ॥४१॥

षड्ऋतुचर्या कथन.

ब्रह्मावर्तक्षेत्रीं होतोंमीपूर्णएकवर्षभर ॥
शोभेकसेंनदीतट कथितोंहोतांहिमोष्मवर्षभर ॥४२॥

हेमंतऋतु.

वर्धयतिहिनोतिबलं ह्मणुनीहेमंतहेंजयानाम ॥
अवघ्यांउपभोगाचें होतोऋतुहाचिनिश्चयेंधाम ॥४३॥
अतिदीर्घतानिशांची शीतेंसंकोचरोमकूपाचे ॥
करितिभुकेलेलोका प्रातःकालींचहोअंपूपाचे ॥४४॥

---

१ लबाड २ मुलांनीं ३ मोठे ४ मकर ५ गंगा ६ अतिशय ७ वाढवितो ८ स्थान ९ आंगावरील केसांचीं भोकें १० वडा घारगा इत्यादि.



स्नानानिघेप्रभातीं जनपरिचित्तांतहोयहिमभीत ॥
स्वजलामंदोष्णकारिसि गंगेबांधीनकींतयाशीत ॥४५॥
प्रातःकालींत्वज्जल असतेंमंदोष्णहोयमगथंड ॥
प्रातःस्नाननकरित्या वाटेलोकांसिकरिसिहादंड ॥४६॥
तोंवरिह्मणेलमिथ्या जनकथिताअग्निबाजलींराहे ॥
हेमंतींप्रत्यूषीं धूमसहितअंभजोंवरिनपाहे ॥४७॥
हास्यजसेंसाध्वींचें कुलटेचेस्नेहनियमवाजैसे ॥
दंपतिचेकलहचिबा अस्थिरहेमंतदिवसहीतैसे ॥४८॥
गर्भागारसुवासित सेवकजनकरितिघालुनीधूप ॥
मृदुशुचिशयनींनिजती प्रियतरतरुणीसवेंचिमगभूप ॥४९॥
तैशास्थलींहिशिरतें हेमंतोद्भवसुतीक्ष्णतरशीत ॥
होऊंनयेदरिद्रें येतांहेमंतकेविंमगभीत ॥५०॥
प्राशुनिमदांधमद्या नृपदेतीस्त्रीसानित्य नविस रती ॥
विषयासक्तअसेते श्रीगंगास्नानकेविंन बिसरती ॥५१॥

शिशिरऋतु.

गेल्याहेमंतजन स्मरतीत्याच्यागुणद्वयायोग्या ॥
वारीअयत्नशीतल रात्रीतैशाचिदीर्घउपभोग्या ॥५२॥
नामेंशिशिरअसेहा कींप्लुतगत्यर्थहोयशशधातू ॥
धांवतिपथिकसुवेगें याअर्थेंकथितिलोकशिशिरऋतू ॥५३॥
शिशिरागमींवहातां झुळझुळओढेहिशोभतीफार ॥

---

१ प्रभातीं २ जारिणी ३ शयनगृह ४ त्वरित.

वनदेवीकंठांतुनि मोत्यांचेसांडलेजसेहार ॥५४॥
शुभ्राशिशिरींचंद्रें रात्रींहंसेंहिउदककुमुदांहीं ॥
सरभूतृणेंवनांतहि मालतिपुष्पेंदिशाहिमेंदाही ॥५५॥
शिशिरेंशीतव्यथिता लोकांचेंदुःखकांहींसेंहरिलें ॥
होइलजनासिसुखकर जैसेंतैसेंचिउष्णहीवरिलें ॥५६॥
हेमंतींअतिकठिणहि शिशिरींलोकांसिहोतसवघडती ॥
यास्तवगंगास्नानें करितीरंकाहिअश्वसवघडती ॥५७॥

वसंतऋतु.

मदनाद्युत्सवजेथें वसतीनामेंहियास्तववसंत ॥
आश्चर्यकायविषयीं विषयाचीघेउंह्मणतिचवसंत ॥५८॥
दक्षिणदिशेसिसोडुनि रविजैसाउत्तरेकडेआला ॥
तैसावसंतऋतुही आरामींहळुहळूप्रकटझाला ॥५९॥
येतांवसंतगंगा-तटवृक्षींपिकेंहिलागलागाया ॥
नरहोनरजन्मनये श्रीमद्गंगापदासि लागा या ॥६०॥
उष्णशिथिलबंधांहीं कुसुमांहींतूजपूजुनीअंबे ॥
ह्मणतीतीरस्थतरुहि धन्यनदूरस्थनरहिभोअंबे ॥६१॥
येतांवसंतझाले पुष्पिततरुसमधुपालवीफुटली ॥
प्यायामधु मधुपांची चिरकालक्षुधितमंडळीउठली ॥६२॥

१ तलाव २ अश्वमेध. ३ कोकिलपक्षी ४ अंब्याचीं झाडें ५ माते, अंब अशी सबुद्धी संस्कृतांत होते प्राकृतांत अंब अशी होण्यास अडचण वाटली ह्मणून अंबे असा प्रयोग केला आहे.

मधुदानेंमधुपांतें दिधलीअन्येंनतन्निजशिबकुलें ॥
गुंजारवेंह्मणतियत् सहवासेंकाढिलेंचि नशिबकुलें ॥६३॥
फुललींकमलेंज्यांच्या सौंदर्येंसुंदरीकदंब गळे ॥
विधुलालाजविणारे त्वत्तीरींबैसतीविशद बगळे ॥६४॥
रविनेंस्वैखरकरांहीं ताडुनियांदूरदवडितांशीत ॥
अवगाहसुखेंकरिती तुझियाउदकांतगाउनीगीत ॥६५॥
दोलोत्सवजनकरिती बांधितितवतीरतरुवरींदोला ॥
नारीप्रभातसमयीं भूपाळ्यागातिरागहिंदोला ॥६६॥
द्विजखेचरभूचरही त्वत्तीरींकरितबैसतीध्यान ॥
मत्स्यवधप्रथमाचें दुसऱ्याचेंहोय ईश्वरज्ञान ॥६७॥
अतिशुभ्रतें तुझेंजल तीसिकतातींफुलेंहिवासरतें ॥
चंद्रयुताराात्रिहित्यों यांचेंवर्णनकरून कां सरतें ॥६८॥

नास्तिक समाधान.

वृक्षांचेंजीवनजल ह्मणणेंमिथ्याचिहेंपहानवती ॥
आलीउष्णांतअशा तीशतघटओतितांहिजीनवती ॥६९॥
भगवान्स्वतंत्रआहे वांचवि त्या मुंगिलाहि जी, वातें ॥
मरतेमारिलतत्क्षणिं इच्छिलतरिगजसमानजीवातें ॥७०॥
नेणुनितत्सत्तेतें करितीनास्तिकअनेकविधतर्क ॥

---

१ लाजे २ स्वच्छ ३ तीक्ष्णकिरणांहीं ४ स्नान ५ झोंपाळा ६ रागभेद ७ पक्षी–ब्राह्मण–क्षत्रिय–वैश्य ८ ईश्वराचें ज्ञान आहे ज्यांतअेसे ध्यान ९ अवर्णनीय १० पालवी.

करिलप्रभावज्याचा अकीर्तिराहुराहुतेंअर्क ॥७१॥
चूर्ण[1]हरिद्रायोगें ईश्वरकै[2]शासहोतसेलोल ॥
कोठेनिशक्तिपरिही हेंनविचारूनिफुगवितीगाल ॥७२
ऐशाअघटितकर्मं ईश्वरअपुलीस्वतंत्रतादावी ॥
कींव्हावेंज्ञानजनां चित्तांतुनिबुद्धिनास्तिकाजावी ॥७३

ग्रीष्मऋतु.

सु[3]रभिऋतुवर्णनातें संपउनीवर्णुंउष्णऋतुचर्या ॥
वर्णनअल्पनदीर्घहि होइलइतुक्याचिहोकरूंआर्या ॥७
ग्रासीरसासिह्मणुनी याऋतुलाग्रीष्म हेंचिनामअसे ॥
ह्मणतिनिदाघहियाकीं आंगींअत्यंतदाहकत्ववसे ॥७५
आरंभींचजयाच्या कर्दमरूपाचिहोतिआप[4] सरीं[5] ॥
त्रासुनिउष्णेंबैसुनि अनातपींजीवजातआ पसरी ॥७६
सूर्याचेतापानें झालीसंपूर्णजर्जरित[6]धरणी ॥
केवलतरंगिणीची रविकिरणसमूहदावितीकरणी ॥७७
धांवतिमरीचि[7]केला जलमानुनितृषितमृगउगेंदमती ॥
मिथ्याविषयासत्य भ्रांतीनेंभ्रमतिजेविंमंद[8]मती ॥७८॥
दिवसांतसुखदवाटे लागेपडतांचिनीजछायेंत ॥
स्नानेंसुखवहहोती कमलवनावरुनिवायुहीयेत ॥७९॥

---

१ चुना २ तांबडें ३ वसंतऋतु ४ उदक ५ सरोवरांत ६ भेगापडलेली ७ मृगतृ
८ मूर्ख.



झाल्याकर्दमशेषा होत्याभरल्याजलेंअशाहि नद्या ॥
मेघागंगाचिह्मणे राहिनपूर्णाजलासिद्या किं न द्या॥८०॥
रवितापेंभूतडके वृक्षहिसुकतीमहा[1]ह्रदहिअटती ॥
यद्यप्यतिमृदुलतरी कमलांचेताठवेकसेनटती ॥८१॥
शिरतांकर्णद्वारें उष्णेंवातेंहिपुष्टनर मरती ॥
दुर्गंधाहिपलांडुस हितयास्तवआदरेंशिरींधरती ॥८२॥
अंतर्गृहांतनिजती दिवसांतींदाविर्तीजनस्वमुख ॥
जाउनिजळांतलोळति तुझियातेंवर्णवेमलानसुख ॥८३॥
सोशीरजलप्राशन हेंग्रीष्मींमुख्यतर्पणचिअसुचें ॥
कींयावांचुनिदुसरें लोकांतेंअन्नभक्षणहिनसुचे ॥८४॥
ह्मणतीव्यजलपानें होतांनिर्वाच्यतोषलोकांस ॥
ह्मणसीवृथाचिअमृता घालुनिगंगाजयाअैलों,कास ॥८५॥
यावीनीजह्मणोनी स्वकरींघेवोनिहलावितीव्यजना ॥
परिहलतांनीजनयें तापरहातांकरीप्रबुद्धजना ॥८६॥
उठतीफोडशरीरीं रवितापेंदाटकींजशाफोडचा ॥
ऋतुहामरणचित्यांचें जनतारुण्यांतकरितिजेखोडचा॥८७॥
रविहुनिअधिकातापा जेव्हांलोकांसिदेतसेसिकता ॥
ह्मणतीथोरापासुनि निंद्यगुणाचिनीचहोकसेशिकतां ॥८८॥
येतोग्रीष्मऋतूंताचि गंगेतुजपूरपारिनहींचित्र ॥

---

१मोठालेडोह. २कोवास, ह्या रोगावर कांदा औषध आहे ३ कंवर बांधून ४ पंखा ५ वाळू ६ आश्चर्य.

हिमशैलगतहिमातें विघरवितोकींस्वदीप्तिनेंमित्र ॥८९॥

वर्षांकाल.

वृषुसेचनेंप्रवर्षे ह्मणुनिप्रावृट्तसेंह्मणतीवर्षा ॥
पँकिलमार्गमलिनजल करिपरिलोकांसेदबहुतहर्षा ॥९०॥
प्रावृट्प्रवृत्तहोतां आच्छादुनियांनभासिअभ्रांहीं ॥
संतापदूरकेला धारांहींवर्षुनींअंदभ्रांहीं ॥९१॥
वर्षाभूहिमयूरहि ओरडतीनाचतीकरितिहर्षा ॥
तर्षांबाधनतुह्मा जनहोह्यापातल्यापहावर्षा ॥९२॥
पावेअनुक्रमानें वृद्धीतेंप्रेरितांचिंजी,वातें ॥
वर्षाउत्पन्नकरिति तृणतरुकीटाद्यनेकजीवांतें ॥९३॥
घेउनिकरासिपुनरपि लोकहितानृपजसाभलालावी ॥
स्वकरेंघेउनितेंसें ग्रीष्मेंअटतांचिरविजलालावी ॥९४॥
नक्षत्रलोपहोतां रात्रींखद्योतभासतातितसे ॥
बुडतांवेदकलियुगीं नाचतिनास्तिकसुखेंकरूनिजसे॥९५॥
वर्षेपर्वतशिखरें मेघांनींव्यापसर्वथकेलीं ॥
साहतिसुखेंचिपरितीं शूराशरवृष्टिवाटतेंकेलीं ॥९६॥
अल्पेंजलेंचिगर्जति ओढेलंघूनिभ्रंवतीस्वतट ॥
भंगुर[13]तारुण्यधनें नरजेविभ्रमतिनाहिंज्यांसिअंट[14] ॥९७॥

---

१ सूर्य २ शिंपणें ३ पर्जन्यकाळ ४ कर्दमयुक्त ५ मोठ्या ६ बेडूक ७ तह्रान ८ प्रावृट्
९ वायूनें १० दे ११ वृष्टीकरून १२ क्रीडा १३ चंचल १४ मर्यादा.

गंभीरजलाशांता पाहुनिगंगेसतींतेविरंती ॥
होतांसाधुसमागम लाजुनियांनीचपावतीविरंती ॥९८॥
इतरांनद्यांसियेतां होतीतत्कालपूरमलिनजला ॥
शुचिसर्वदारहाया देवनदीचाचिओघहासजला ॥९९॥
नसतीएकक्षणही एकींपुरुषींस्त्रियाजशाअसती ॥
[illegible]ीं क्षणभानक्षणभरींपहाअसती ॥३००॥
मेघागमींयुवतिजन गृहशिखरींचढतिअसतिजेविरहीं ॥
येइलकांतकधींहें जाउनिपुसतीतयासिजेविरहीं ॥३०१॥
जाणोपाचारवचल्या ऐशींसर्वत्रभूदिसेहिरवी ॥
शोभापाहुनिह्मणतो साक्षाल्लक्ष्मीचहीवनींमिरवी ॥२॥
झंझावातेंजलनिधि माजींकल्लोलउठतिजलदवळे ॥
शिवतींस्त्रियातयाला रजोवतीह्मणुनिकायतोखवळे ॥३॥
मेघकरीधाराकर ज्यांहींउपटोनिकाढिलींकमलें ॥
आलोडनेंजयांच्या कलुषितझालींतसींजलेंअमलें ॥४॥
तृणगुल्मवीरुधांहीं केवलसंश[illegible] जाहलेसरणी ॥
अनुपानत्सोपानत् कंटककर्दमनचालुंदेचरणीं ॥५॥

---

१ गंगेंत २ ओढे ३ मिळती ४ उपरती ५ स्वच्छ ६ व्यभिचारिणी ७ वीज ८ पति विरहित ९ एकांतीं १० बादळ ११ मोठ्या लाटा १२ रजस्वला १३ हत्ती १४ शुंडा १५ लोळण्यानें १६ वृक्षाच्या जाळ्या १७ लता १८ मार्ग १९ जोडा घातल्या वांचून २० जोडा घालून.

अगस्त्युदय.

अस्पृश्यतानद्यांला येतांउदकार्थकष्टतीविप्र ॥
जोंतोंअगस्त्यभगवान् तत्क्लेशास्वोदयेंहरीक्षिप्र ॥६॥
टाकुनिऔद्धत्यनद्या स्वच्छाशांताहिजाहल्यासरला ॥
भ्याल्याऋषिलाज्याच्या तानेलापतिनआपुलापुरला॥७॥

शरदृतु.

पाकेंविशीर्णहोती औषधियास्तवचिशरदृतूहोय ॥
करितोहाचिजनांची वर्षभरींउदरपूर्तिचासोय ॥८॥
येतांचिशरदृतूनें दवडुनिमेघांसिजलमलाहरिलें ॥
निष्पंकमार्गकेले कुमुदसमूहेंतडागहीभरिले ॥९॥
मेघनदेतीउदका मोठ्यानेंगर्जतीपरंतुफुका ॥
बडबडतीकृपणवहू हातींचापरिसुटेनजेविंरुका ॥१०॥
होयप्रतिक्षणजल क्षीणपरीमत्स्यजाणतीनतसें ॥
होतांहीआयुःक्षय तिकडेजनमूढचित्तदेनजसें ॥११॥
शारदनिशानिशाकर यद्यपिपळवीचशततिमिर,वावें ॥
तेणेंअन्यत्रपरि श्रीमद्रंगेपुढेंनमिरवावें ॥१२॥
भवमुक्तलोकजैसा तैसाघनमुक्तजाहलातरणी ॥
होतांसुशांतसागर वैश्यहिवृत्यर्थहाकितीतरणी ॥१३॥
गंगेवरिचवरिधरी ऋतुहासुंदरसपुष्पकांशाची ॥

---

१ तृण विशेष

32304

ढळतेराजाशिरींपरि ऐशीशोभातयेसिकाशाची ॥१४॥
याचिसुशरदृतुकालीं शीतोष्णतसेंनिशादिवसमान ॥
टाकुनिअधिकान्यूना भावातेंहोयकेवळसमान ॥१५॥
षड्ऋतुचर्याकथिली परिआणिलवाचकांसिकंटाळा ॥
प्रकृतेतिहासवर्णू देउनियांवर्णनासियाटाळा ॥१६॥

ब्रह्मावर्तक्षेत्र.

ब्रह्मावर्तक्षेत्रीं असतीप्रासादबहुतदेवांचे ॥
विस्तारबहुनहोतां वर्णूऐसीचशक्तिदेवाचे ॥१७॥
सुंदरगंगामंदिर निर्मितजेंहोयबाजिरावानें ॥
स्तनितेंमयूरसाजो आनंदेअर्थिजनविरावानें ॥१८॥
करितीउत्सवतेथें प्रत्यब्दींथोरदशहरायोगी ॥
खातीयथेष्टअन्नें द्विजशूद्रव्यंगदीनबहुरोगी ॥१९॥

पेशव्यांचें चरित्र.

यद्यपिजाणातिसर्वहि यांचीमीसागतोंकथाथोडी ॥
देशाभिमानज्यानां त्यानांवाटेलवाचतांगोडी ॥२०॥
पुण्याग्रामींएकचि विप्राचाउदयपावलावंश ॥
मौक्तिकज्यांतुनिनिघतें ऐसेअसतीवनींबहुनवंश ॥२१॥
उपनामभट्टज्यांचें साताऱ्याचेप्रधानकींहोते ॥
जनह्मणतिपेशवेज्यां अनुपमयोद्धेहिसर्वजेहोते ॥२२॥

१ मेघशब्द २ शब्दानें ३ वेळू. यांत मोती होतात अशी परंपरा आहे.

यन्नामस्मरणेंही कांपतिउन्मत्तदांडगेयवन ॥
कुलहेंदावाग्निह्मणा दुष्टयवनहेंचिशुष्कहोय वन ॥२३॥
मोठ्या[१]कंटकटिकेल्या यवनांहींजरिहटेंकरूनि कट ॥
जिंकुनित्यांतेंस्वक[२]टक नेलेंअटकानदीतटा निकट ॥२४॥
युद्धेंकरूनित्यांनीं घ्यावेंबैसूनिदानकींज्यानीं ॥
परकरगा भूआणिली स्वस्त्रीतेंजेविंजा[३]नकीजानी ॥२५॥
ज्यांच्याकृपाकटाक्षें उदयातेंपावलींकितीकभ[४]टें ॥
झुलतीघरांतहत्ती नवतींज्यांचेघरींखरेंचितटें ॥२६॥
होऊंनयेपरंतू ध्वजहूणांचेपुण्यावरीचढले ॥
अमुच्याचिहेंनत्यांच्या दुर्दैवेंकरुनियांअसेंघडलें ॥२७॥

बाजीराव.

ब्रह्मावर्तक्षेत्रीं श्रीबाजीरावजाउनीराहे ॥
दाउंनशरीरअन्या श्रीगंगेच्याचिवाहुं नीरा हें ॥२८॥
ऐसेंह्मणेनिरंतर जरिहोतेंपूर्णकोशहे[५]मानीं ॥
राज्यासिनजीवांसी मानितिजैसेंयशास हे, मानी ॥२९॥
प्रतिबंधींहिजयाचा बांचविबहुकरउदारअर्थिजना ॥
स्वप्नांतहिद्याचिह्मणे कींहोताध्यासनित्यहाचिमना ॥३०॥
गंगातीरींयांणीं बांधियलाघाटनामकलवारी ॥
ज्याच्यावरूनिजातें गंगेतवकरितशब्दक[६]लवारी ॥३१॥

---

१ लढाया २ स्वसैन्य ३ दाशरथीराम ४ ब्राह्मण या शद्बाला, जेव्हां न्यूनत्व देता[त]
तेव्हां नपुंसकांत प्रयोग करण्याचा पाठ आहे ५ सुवर्णानीं ६ अस्पष्टमधुरशब्द.

कानपूर.

अतिवेगेंओघतुझा कानपुरालागिंजेधवांआला ॥

तन्नगरस्थजनांतें आत्यंतिकहर्षतेधवांझाला ॥३२॥

युद्धादिकलाशिक्षित हूणांचेंराहतेंजिथेंसैन्य ॥

ज्यांहींईशकृपेनें शत्रुपुढेंभाकिलेंनसेदैन्य ॥३३॥

नानासाहेबाचें बंड.

श्रीशालिवाहनाचा जोशकनवसातसातएकपहा ॥

असतांअत्रत्यजनीं राजाचाद्रोहमिळविलाचिमहा ॥३४॥

इतिहासदीर्घआहे लिहितांविस्तारहोयहाभारी ॥

भीमीयासिपरंतू कथिनकथाथोडक्यांतहीसारी ॥३५॥

वार्तामिथ्याआली अणिलेसैन्यांतकांतडीतोटे ॥

ज्यांच्यास्वीकारानें धर्मीहोतातितांतडीतोटे ॥३६॥

केलेंमिषहेंकेवल हेतुअसेसत्यदूसराज्याला ॥

प्रतिबंधदत्तकाचा केलाकींमांडलीकराजांला ॥३७॥

तेणेंअनेकराज्यें होतांनिर्वंशहोलयागेलीं ॥

वास्तवहेतुअसेहा जेणेंत्यांचीप्रजाहिरागेली ॥३८॥

नम्रत्वेंविनवावें लोकांनींकळउनीस्वदुःखनृपा ॥

विनयानेंहोयजसी औद्धत्येंकेविंहोयराजकृपा ॥३९॥

यान्याय्यपथासोडुनि लोकांहींमार्गवांकुडाधरिला ॥

---

१ कातड्याचेतोटे २ त्वरित.

चटकांहींगरुडाशीं तैसायांहींविरोधआदरिला ॥४०॥
केलैंबंडानेंणुनि कींहेंआह्माकुकर्मबाधेल ॥
ह्मणतीइच्छितअपुलें राजाकेल्याविनानसाधेल ॥४१॥

बाजीरावाचे दत्तक पुत्र.

होतेब्रह्मावर्ती दत्तकसुततीनबाजिरावाचे ॥
तिकडेजाउनिह्मणती नृपव्हाचालारणाजिरा वाचें ॥४२॥
भ्राताज्येष्ठसहोदर नानासाहेबहोयसर्वांत ॥
ज्यातेंप्रार्थुनिह्मणतीं आजिकरूंयाचि हूणगर्वांत ॥४३॥
याचाकनिष्ठबंधू बाळासाहेबहोयजोदुसरा ॥
साहेबरावनामें दोघांचाभ्रातृपुत्रहातिसरा ॥४४॥
ऐकुनियांतद्वचना कानपुरालागिंसर्वतेआले ॥
ज्येष्ठाकरूनिराजा त्याच्याआज्ञेंतसैन्यतेंचाले ॥४५॥
लुटिलेंधनकोशातें त्यांहींयेतांनिवेशसेनाचे ॥
करुनीदग्धयशस्वी झालोंमानूनसैन्यतेंनाचे ॥४६॥
मोठेइंग्लिशयोद्धे अबलांबालांसवेंहिबंदींत ॥
त्यांहींटाकियलेजे होतेत्यांच्यापदासिवंदीत ॥४७॥
बैसतित्यांच्याचिरथीं बैसावेंज्यांतगौरकायांनीं ॥
शकटानईजनारथ मिळतांबैसूंनयेचिकां,यांनीं ॥४८॥
सेनाजाउनिउरतां हूणस्त्रीबालसहितजनअल्प ॥

---

१ चिमण्यानीं २ सैन्याचातळ ३ इंग्लिशांनीं.

वाटूनयेकसेंत्यां कींआलाआजिनिश्चयेंकल्प ॥४९॥
नवधालजरिअह्मातें होइलबहुलाभहासुसंदेश ॥
त्यांहींपाठविलापरि कोठुनितेंऐकतीलमंदेश ॥५०॥
धनकीर्तिलाभहोतां वांचवितेत्यांसिसंकटींनाना ॥
परितत्घातोपायचि निंदितबीभत्सयोजिलेनाना ॥५१॥
नवधूंअह्मीतुह्मातें प्रथमअसेंसत्यत्यांसिहोकथुन ॥
विश्वासघातकरिते झालेतेसर्वतेधयांमथुन ॥५२॥
गंगापरतीरातें जावेंयेथेंनराहवेंऐसें ॥
सांगुनिनौकांतुमिते जातांकेलेंकुकर्मतेंकैसें ॥५३॥
अतिघोरकृत्यऐसें कोणाच्याऐकवेलकानानें ॥
तोफालाउनिमध्यें मारविलेसर्वलोकनामानें ॥५४॥
शूरेंयुद्धकरावें शत्रुवधविसमक्षउत्साहें ॥
देउनिअभयावधितां कैसेंनकरीलकर्मकुत्साहें ॥५५॥
इतुक्यानेंहिअतृप्तचि होउनिशिबिरींनबैसलेउगले ॥
झालोंनरपतीआतां ऐसेंमानीमितिमदेंफुगले ॥५६॥
कुत्सितनानोपायें वधिलेंबालांसतेविंअबलांस ॥
नसतीशूरखरेते ऐशाठायींचदावितिबलास॥ ५७॥
यादुष्कर्मेंअपुल्या विमलकुलालाहिलाविलाडाग ॥
यांहींअपुल्यासितशी अवघ्यादेशासिलाविलीआग॥५८॥

१ प्रलय २ निरोप ३ मूर्खश्रेष्ठ ४ नानासाहेब पेशवे ५ निंदा ६ स्त्रियांस.

स्त्रीसुतघातविलोकुनि उग्रेंकोपेंकरोनितेकढले ॥
अल्पावशिष्ठजरितरि बहुतांशींस्वांतहोयतोंलढले ॥५९॥
निर्वीराभूमानुनि झालेजोंविषयसेवनींलुब्ध ॥
तोंहीवार्ताऐकुनि आलेंनवसैन्यहोउनीक्षुब्ध ॥६०॥
नानादिबंधुसर्वहि सेनाघेवोनियांरणाआले ॥
स्वल्पाचिकालपरंतू त्यांच्याआज्ञेंतसैन्यतेंचाले ॥६१॥
खातीयथेष्ट अन्नें टाकितितेसंकटांतराजातें ॥
आश्चर्यकायज्यांचा नवतापरिचयहिकींखराज्यातें॥६२॥
कैचेंयुद्धतयातें दूरुनियांपाहतांचिहेपळती ॥
हूणप्रहिताग्न्यस्त्रें तरितेव्हांजनशतावधींजळती ॥६३॥
हूणाचानवसेना सेनापतिहेवलाकनामानें ॥
होतांशत्रुसदंडें वागवितैसेंसुव्हज्जनामानें ॥६४॥
राजद्रोहीजनजो तोतेणेंदंडिलाचिदेहांत ॥
केलासंतुष्टहितो त्यांतेंजोसंकटांतदे हात ॥६५॥
ह्मणतीकोणिअसेंकीं नानाहातेंचिसर्वहेंघडलें ॥
नव्हतेंतच्चित्तींपरि ह्मणतीसैनिकचि आग्रहापडले ॥६६॥
होवोकैसेंहिपरी घडलेंअतिघोरसर्वथाकृत्य ॥
राजाह्मणेलकैसे असतीविश्वासयोग्यहेभृत्य ॥६७॥

---

१ नानासाहेबाचा २ सैनिकातें ३ इंग्लिशांच्या तोफांनीं ४ सेवक.



बंडापासून लाभ.

ह्रोतेजसेकुकर्मा तैसेंतेंहेतुएकशुभकर्मा ॥
वर्णावेदोषगुणहि नातरियेतोचदोषकविधर्मा ॥६८॥
नव्हतेंचिव्हावयाचें मारितिजनजरिसहस्त्रहाकेला ॥
स्वप्राणातेंवाहुनि त्यांहींस्वजनांसिलाभहाकेला ॥६९॥
जाणुनियांस्वान्याया दत्तकसुतघ्यावयासिराणीनें ॥
आज्ञादेतांप्रमुदित राजेसामंतयाशिराणीनें ॥७०॥
इतरहिलोकसुखावे दाखवितांहानृपेंकृपालेश ॥
ठेविलसुखीप्रजेतें नांदेचिरकालतोनृपालेश ॥७१॥
इत्यादिकिर्तिवदावा आहेइतिहासदीर्घहाभारी ॥
लिहिलाहाचिबहुअसे नह्मणेत्याचाअसेनआभारी ॥७२॥
आलेंस्थलप्रसंगें वर्णावेंवृत्तहेंह्मणोनिमनीं ॥
धरिलेंपरिनचठावें झाल्याअतिदीर्घनावडेलजनीं ॥७३॥
जनतोक्षमाकरोमज कींम्यांइतिहासहातयांकथिला ॥
गंगास्तवकनकालं-कृततत्कर्णांतघातिलेंकथिला ॥७४॥

प्रयाग.

नकराक्रोधतुह्मातें त्वरितचिमीदावितोंप्रयागास ॥
सुगतिप्राप्त्यर्थजिथें करिसाक्षाद्ब्रह्मदेवयागास ॥७५॥
अतिदूरतीर्थनृपतो जातांयेतीनऊहिनाकास ॥
गंगाश्रयेंचिपरिजन हेकितिजातोक्षणांतनाकास ॥७६॥

१ नऊ इंद्रियें नाकास येती ह्मणजे प्राण व्याकूळ होतात इतकें दूर आहे. २ स्वर्गाि

आलोंअह्मीप्रयागा ग्रामदिसेहाहितीर्थराजपहा ॥
निष्पापकरिनतैसें कृछ्रादिव्रतजसानराजपहा ॥७७॥
जनहोश्रवणकरावें कथितोंप्रथमप्रयागरचनेतें ॥
गंगायमुनातीरीं नंतरमाझेंतुह्मांसिवचनेतें ॥७८॥
जनहोप्रयागपुरहें गंगायमुनातटावरीआहे ॥
ज्यामाजिलोकसंख्या षष्टिसहस्राधिकासदाराहे ॥७९॥
विस्तारदीर्घफारचि उत्तरदक्षिणदिशेसिहोयाचा ॥
पश्चिमपूर्वदिशेसहि आहेपरिईतुकानहोयाचा ॥८०॥
शालामोठीआहे जेथेंविद्यासुधामिळेअवघ्यां ॥
जनहोतेथेंजाउनि बहुनाहींस्वल्पतरितिचीचवघ्या ॥८१॥
वृषभाश्वयुतरथावरि सर्वत्रहिकथुनिकाय राहोतें ॥
बैसतिगजयुक्तरथीं म्यांहेंइकडेचिपाहिलेंहोतें ॥८२॥
येथेंबळकटमोठा आहेलोकींप्रसिद्धभुइकोट ॥
पावतिपराभवातें आलेयुद्धासिशत्रुजरिकोट ॥८३॥
रक्षणसंकटिंव्हाया वेष्टितचहुंकडुनिखंदकानें, तो ॥
कींमार्गनिरोधाया जनतेथेंयामुनोदकानेतो ॥८४॥
अक्षय्यवटद्रुमजो विलसेयेथेंचितोतळघरांत ॥
हिरवाचिसततमगहा करिलनकोणासिविस्मयनरांत।८५।
शीतोष्णेंअधिकजशीं तैशोअधिकानहोयवृष्टिजरी ॥
होयप्रयागदेशीं अत्युत्तमधान्यज्यांताविपुलतरी ॥८६॥



त्यांताहिमुख्येंधान्यें असतीकापूसनीळ आणिगहूं ॥
जरिकांहींन्यूनतरी सोरासाखरअफूहिहोयबहू ॥८७॥
भूवरिअनेकअसती तटिनीसंगमपरंतुयास महा ॥
तोदृग्गोचरहोतां केविंनहोईलतोष यास महा ॥८८॥

दशाश्वमेधनामक स्थल.

गंगादशाश्वमेधीं आलीस्थलहेंप्रसिद्धकींतेथें ॥
यजितांदशाश्वमेधें पूर्वींपरमेश्वरासिहोंजेथें ॥८९॥
नेतीगृहासिगंगा--जलजनयेथेंभरून कावडिला ॥
स्नानाघालुनिह्मणती दुर्गतिशंकाधरूनकावडिलां ॥९०॥
गंगाप्रयागराजीं सुमहद्वेगाधरूनियांआली ॥
वाटेभेटायाला धांवेतीजवळपाहुनी आली ॥९१॥
यमुनागंभीरजला आहेवर्णेंकरूनजीश्यामा ॥
वाहेमंदगतीनें चालतिऐशाचिमानिनीश्यामा ॥९२॥
तैसीतिसरीहिनदी गुप्तेंरूपेंसरस्वतीराहे ॥
ह्मणुनित्रिवेणिसंगम ऐसीआख्यास्थलासियाआहे ॥९३॥

संगम.

देवनदीदक्षिणगा आहेतैसीचपूर्वगायमुना ॥
ज्यांचासंगमपापा कार्पासाभिवंवितोजसादमुना ॥९४॥
होतांसंगमतोषें लहरिमिषेंतुह्मिकरीतसांनाच ॥

---

१ मला २ सखीयमुना ३ तरुण स्त्रिया ४ अग्नि.

चिरकालप्रियदर्शन लाभाहुनिअन्यलाभसानाच ॥९५॥
भगिनीचअसतियाकीं दोघींचाएकतुहिनगिरिबाप ॥
वरिलापितृस्वभावहि मगत्याकैशानहरितिजनताप॥९६॥
कर्मगुणएकआहे भिन्नदिसेवर्णयद्यपितदोघीं ॥
पावित्र्येंशीतत्वें तापहरायासमाचिकींदोघी ॥९७॥
माहात्म्यकितिवदावें यांचेंम्यांवेदगीतमहिमाज्या ॥
एवंविधसुचरित्रा अन्याकर्णीअलीननैंइमाज्या ॥९८॥
संगमंसितासितांचा स्नातनरावासदेसदानाकीं ॥
मुक्तचिहोतोयेथें अपुल्यादेहासिधीरजोटाकी ॥९९॥
ऐसेंश्रुतिमतआहे यास्तवचित्तींधरोनिविश्वास ॥
करिलस्नानजरीतरि तारिलहानिश्चयेंचिविश्वास ॥४००॥
देहाटाकितहोते नरआश्रयकरुनिमोक्षधर्माचा ॥
परिराजानेंसंप्रति केलाप्रतिबंधयासुकर्माचा ॥४०१॥

क्षौराची मौज.

मुंडितिअन्यतीर्थी लोकस्वशिरांसिजावयापाप ॥
परितेज्यांचेअसती गेलेसोडोनिलोकहाबाप ॥२॥
मुंडनतेथेंमंडन असतांहीमर्त्यभूमिवरितात ॥
स्वक्षौरातेंतत्सुत नापितहस्तेंसुखेंचिकरितात ॥३॥

१ लहान २ हिमालय ३ नदी, हा प्रयोग मोरोपंतानीं दिला आहे ४ गंगायमुनांचा ५ स्वर्गी ६ जगतांत ७ भूषण.

स्वस्त्रीचीपतिकोणीं सुभूषिताचारअंगुलेंवेणी ॥
कापुनिअर्पुनिह्मणती इजलासौभाग्यसततदेवेणी ॥४॥
राहोहेंसधवाज्या अशुभाचाशब्दहीनआयकिती ॥
निःशंकत्याहिकरिती यातीर्थीमुंडितस्वकायकिती ॥५॥
तेथेंपडलेअसती अत्युन्नतबहुतराशिकेशांचे ॥
वाटेएकेठायीं अणिलेंओढोनिपापदेशाचें ॥६॥
लोकशतावधियेती स्नानालागूनिनित्ययाजागीं ॥
तितुक्यांचेंहिकराया हितआहेवेणिहीसदाजागी ॥७॥

मकराचा मेळा.

लक्षावधिप्रजाये जैंयेतोमकरराशिलातरणी ॥
अश्वांहींशकटांहीं बहुधार्मिकतेंविआपुल्याचरणीं ॥८॥
नानादेशांहूनीं येतिजनांचेतदाअनेकथवे ॥
करितीमासभरीजो उत्सवतेथेंमलानतोकथवे ॥९॥
असतीपुष्कळनौका सिद्धसदांदोनिहीनद्यांमाजी ॥
हलतीशिडेंतयांचीं बाहतिलोकांसिशीघ्रतरयाजी ॥१०॥

आगबोट.

इथवरयेतीनपुढें मोठाल्याअग्नियंत्रयुतनावा ॥
गंगाजलउथळतया--माजीतद्देहतोकसायावा ॥११॥

---

१ बोलाविती २ फारमोठा.

करितिजनान्यूनश्रम नौकेचेबांधुनिजलींसेतू ॥
येणेंसुखकरहोतें लोकांचेसाधतीत्वरितहेतू ॥१२॥
द्वारेंजयासिठेविति व्हावाप्रतिबंधकींननावाला ॥
उघडुनिझांकुनित्यांतें नावांतुनिलोकजातिगांवाला ॥१३॥
गांवांतहिबाहेरहि येउनियांलोकराहिलेअसती ॥
नाहींमनुष्यऐसे भूमीचेभागदेखिलेनसती ॥१४॥
व्हावेंविस्तीर्णस्थल गंगेच्याह्मणुनियेतितीराजे ॥
उभवुनिवस्त्रकुटीतें आनंदेंत्यांतराहतीराजे ॥१५॥
मासभरीअतिविस्तृत हट्टहिनीचोच्चवस्तुनींभरती ॥
क्षुल्लकयद्भतवस्तुहि जनचित्तापाहतांचिकींहरती ॥१६॥
प्रातःस्नानानिघतां थंडीनेंपायवाटतीगळले ॥
परिपळतीजन,कींश्रम,होयवृथायाक्षणासिजरिटळले।१७।
करुनिस्नानाजेव्हां धरणिवरीतरणिबिंबये उदया ॥
प्रार्थितिअनाथजनहे यांचीतुजलाचिअंबयेउ दया ॥१८॥
कोणीस्नानाक्षौरा स्वस्त्रीच्याकोणिवेणिदानातें ॥
करितीअनेकरागीं कोणीगंगास्तवार्थगानातें ॥१९॥
श्राद्धेंकरूनिकोणी यात्रिकजनतृप्तकरितिपितरांतें ॥
दानेंद्विजांसिदेती वांटितितैशींधनेंहिइतरांतें ॥२०॥
श्रीमद्गंगायेथें सात्विकरूपेंकळेनवेदां ती ॥

---

राहुट्या.



लुटिलीचांडालांहीं व्यर्थह्मणतितन्नतन्नवेदांती ॥२१॥
लोकींनीचत्वचियें नीचाचेंक्षणहिलागतांअंग ॥
जरिनीचगास्वयेंतरि करिकुनराउच्चगाभवत्संग ॥२२॥
त्यासंगमरुथलावरि लोकध्वजउभवितीस्वनामाचे ॥
तैसेकाष्ठविनिर्मित अर्पितिवेसावयाजनांमाचे ॥२३॥
शीतत्रस्तजनांतें सुखवायाअग्नितेंउदारजन ॥
देती,दीनसुखावह अल्पहिजरितेंचिकृत्याशिवभजन॥२४॥
नानानिंद्याचारें भिक्षेतेंमागतातिकंगाल ॥
तैशापरीहितेथें द्रव्याचीत्यांसिहोयचंगाळ ॥२५॥
वाळूंतकरुनिखळगा पूरितित्यामाजिआपुल्यादेहा ॥
हरिनामोच्चारनसे पैसामजघोषतन्मुखींदे हा ॥२६॥

पैशाकरितां घोर कृत्य.

टाकितिधनार्थमाता अपुलींउघडींचथानपींहिमुलें ॥
शीतेंव्याकुलत्यांतें पाहुनिसाचित्तकोंविंहोनउलें ॥२७॥
सज्जनदेतीवस्त्रें कींत्यांतदुःखपाहवेना तें ॥
मा[illegible]बालचिंहीं लोभसमुद्रांतवाहवे,नातें ॥२८॥

पूल.

यमुनाजलींहिसेतू अत्युत्तमएकबांधिलाआहे ॥
आश्चर्यमग्नहोइल जाउनियांनरतयासिजोपाहे ॥२९॥
मूलापासुनिअग्रा पर्यंतहिसर्वहोयलोहमय ॥

कर्तेंह्मणचिअसती ज्यांतेंपाहूनिआठवेलमय ॥३०॥
नौकामोठाल्याही जातीखालोनिउच्चजोऐसा ॥
मजलेदोनजयाला असतांशोभेलअल्पतोकैसा ॥३१॥
जायामनुष्यघोडे गजरथशकटादिखालचामजला ॥
न्यायाअग्निरथातें लोहपथेंकरुनिवरिलहीसजला ॥३२॥

आगगाडी.

ओढायायागाडिस वृषभनकोतेविंअश्वहीनलगे ॥
ज्यालाअग्नीचह्मणे घटिकेनेंदोनयोजनेंचलगे ॥३३॥
नानायंत्रींसंयुत ठेवितिऐसापुढेंचिरथएक ॥
जोडितित्यातेंएका--मागेंदुसराअसेरथअनेक ॥३४॥
वस्तुस्थिरचरअवघें भरितीत्यामाजिकायजेंहावें ॥
तितुक्यातेंहीघेउनि अतिवेगेंकरुनियंत्रतेंधांवे ॥३५॥
वेगेंअसूनिऐसा ज्यामाजीक्लेशलेशहीनाहीं ॥
जेंसुखनृपासिमिळतें सेवावेंतेंचितेथ हीनांहीं ॥३६॥
असतीमुख्यद्रव्यें रथहाचालावयासिअग्निजल ॥
कोणनजाणेंत्यापरि तत्वज्ञानाशिवायकायफल ॥३७॥
जैसेंजाणतिसर्वहि कींअसतीब्रह्मजीवएकअसे ॥
तत्वज्ञाननजोंवरि होइलहेंज्ञानकार्यकारिकसें ॥३८॥
केलेआज्ञाधारक पूर्वीअग्न्यादिदेवदशकंठें ॥

१ देवांचा कारागीर २ रावणानें.

काथितांमिथ्याह्मणउनि करिनास्तिकत्यांसवेंसदातंटे॥३९॥
परिअग्निरथापाहुनि देतिलतेस्वाग्रहासिसोडोनी ॥
ईशकृपेंकांनघडे नकसेह्मणतीलहातजोडोनी ॥४०॥
स्नाताप्रयागसंगमिं जातोस्वर्गासिबैसुनिविमानीं ॥
होतीवार्ताऐसी परितिसआतांचिनरखरेंमानी ॥४१॥
कींभूविमानरथहा स्वर्गपुरीहोयानिश्चयेंकाशी ॥
येथेंरथांतबैसुनि जायप्रहरेंचिलोकतिजपाशीं ॥४२॥

विंध्यवासिनी देवी.

बैसुनियांयाचिरथीं देवीश्रीविंध्यवासिनीपाहूं ॥
जाऊंचलाचिसत्वर नश्वरदेहासितत्पदींवाहूं ॥४३॥
गंगादक्षिणतीरीं विंध्याचलपादएकजोआहे ॥
त्यावरिजगदंबाही शंकरसर्वस्वपार्वतीराहे ॥४४॥
माहिषरूपधरात्या जीदुष्टाअसुरनायकामारी ॥
हास्यरसेंवशहोउनि अर्पिजिलास्वार्धकाय कामारी॥४५॥
जेतद्भक्तनिरंतर शुंभनिशुंभवधविक्रमागाती ॥
त्यांलागिंह्मणेदेतें व्हावेंतरिपदहिशांक्रमागाती ॥४६॥
ह्मणतीजनविधिहरिहर उत्पत्तिस्थितिविनाशदेहीचा ॥
करितीपरितत्कार्या त्यांतेंशक्तिप्रसाददे हीचा ॥४७॥
व्यापीसकलाविश्वा जीजगदंबास्वकीयशक्तीनें ॥

---

१ इंद्राचे २ ती देवी ३ ह्या देवीचा.

मुनिदेवपूजिताजी तीतेंमाझेंनमोस्तुभक्तीनें ॥४८॥
साक्षाद्ब्रह्मचिनिर्गुण सगुणत्वेंह्मणतिज्यासिहेरंब ॥
होउनियांत्वद्बालक तोश्रीगजमुखतुलाह्मणेअंब ॥४९॥
[१]त्वद्वाहनासिभीमी ह्मणुनीहढतबगळांमिठीघाली ॥
तूंतल्लीलाप्रमुदित पाहुनिशिववदनहाससीगाली ॥५०॥
गंगास्नानकरोनी श्रीदेवीदर्शनासिनरजातां ॥
वाटेनोहेपर्वत चढतोंहेस्वरधिरोहिणीआतां ॥५१॥
दुर्गेस्मरतांतुजला घालविसीसर्वभीतिजंतूची ॥
ध्याया अभीष्टभक्तां सिद्धअससिसर्वदाअईतूंची ॥५२॥
मूर्तिअसेअत्युग्रा दीनजनींकरिसिपरिअसीमदया ॥
गर्जेदिसेभयंकर तरिदेतोमेघजेविंशीतपया ॥५३॥
आश्विनशुक्लांपक्षीं नवरात्रींहोयउत्सवारंभ ॥
सप्तशतीपठणातें करितीबल्यादिबहुसमारंभ ॥५४॥
नक्तव्रतेंस्त्रियाम्न्या तोषवितीतूजहेअन्नादिसती ॥
पतिसुतविरहितहोउनि केवलवाण्यानत्याजनांदिसती॥५५॥
राहतियेथेंहोउनि बहुजनसमुदायतवचरणसक्त ॥
वैदिकतांत्रिकमंत्रें अर्चितिमातितुलातुझेभक्त ॥५६॥

वाम मार्ग निषेध.

वामाचारप्रियतूं अससीयाभ्रांतिनेंकितीलोक ॥

---

१ तुझे वाहन जो सिंह त्यास २ स्वर्गाची शिडी ३ बलिदानादि.

श्रुतिविपरीताचारा स्वीकारुनिपावतीपुढेंशोक ॥५७॥
केलेंस्वेष्टह्मणोनी गणपशिवाविष्णुसूर्यशवींहीं ॥
दक्षिणवामाचारा स्वीकारूंपरिनयेचिसवींहीं ॥५८॥
वेदस्मृतिविहितचिजो दक्षिणत्याच्याविरुद्धतोवाम ॥
केवलअधर्मकारी व्यसनशताचेंहिहोयहाधाम ॥५९॥
धर्मश्रौतस्मार्तचि सेव्यसदैवद्विजातिलागिंअसे ॥
त्याज्यचितंत्रादिकतें संमतजेंकींश्रुतिस्मृतींसनसे ॥६०॥

वाममार्गोत्पत्तीचें कारण.

स्त्रीमद्यव्यसनींजे नरअत्यासक्तजाहलेअसती ॥
त्यांतेंतत्यागाचे कथिलेउपदेशतरिकसेठसती ॥६१॥
यास्तवमदिरापाना द्युपभोगालाहिधर्मताकथिती ॥
कींयामिषेंतयांची हळूहळूदुष्टबुद्धितेंमथिती ॥६२॥
रुततांकंटकत्यातें काढितिजनअन्यकंटकेंचिजसे ॥
दुर्वारव्यसनाच्या नाशार्थचिवामकर्महोयतसें ॥६३॥
ह्मणुनिभ्रष्टजनांसचि सेव्यअसेतंत्रमार्ग,इतरांला ॥
श्रुतिमतधर्मचितारक होयगयाक्षेत्रजेविंपितरांला ॥६४॥
जाणुनिनधर्मतत्वा मद्यपजनघेउनीसुरीसकरीं ॥
मांसेच्छेनेंवधिती श्रीजगदंबेपुढेंकितीबकरीं ॥६५॥
करितिअधर्मयद्यपि तरिजगदंबेदयाचिकरशील ॥

१ गणपति २ देवी ३ सदाशिव ४ ते गणपत्यादि देव.

त्यांवरिदुर्गुणिंबाली मातेचेंशीलतूंहिवरशील ॥६६॥
त्वत्पदवंदुनिजातों मीत्वत्पतिदर्शनासिकाशीला ॥
ईशानुग्रहभाजन होइनऐशाचिदेइंआशीला ॥६७॥
स्वपतिप्रसन्नपाहुनि एकांतींदासहानिवेदावा ॥
मातेत्वांकींजेणें द्यावायांतें,सहानिवेदावा ॥६८॥
गेलीअसेलगंगा दूरअह्मींराहिलोंपहामागें ॥
जाऊंसत्वरसेवक चुकतांनप्रभुकसाभरेरागें ॥६९॥
तेथुनिनीटनिघाली भेटायापूर्वगा,नदीपतिला ॥
परिकाशीतेंयेउनि जावेंऐसेंकथीउमाप तिला ॥७०॥
वाराणसीपुरीतें होउनियांउत्तरामुखा,मगती ॥
आलीदेवनदीती कींआहेसर्वदाहिकामग ती ॥७१॥

काशीवर्णन.

नगरप्रवेशकरितां प्रथमतिलाभेटतेपहाआशी ॥
काशीदक्षिणसीमा--रूपाजीवाहतेनदीखाशी ॥७२॥
आशीहूनिनिघाली काशीतेंद्यावयासिसुखराशी ॥
नाशीपाततरशिवा गाशीतरिशंभुचीअसेखाशी ॥७३॥
स्वाधिष्ठितापुरीही यद्यपिशोभेसकलसुमनसांनीं ॥
गंगागमनेंअधिकचि जेविंवसंतींवनींसुमनसांनीं ॥७४॥
निर्लोभाहिशिवातें लोभविऐसीअसेजिचीकीर्ती ॥

---

१ मला २ कामक्रोधादि षड्रिपूंनीं ३ उमापतीशंकर ४ देवानीं ५ वन ६ उत्तम पुष्पांनीं



मगकांनबासलोभा जीवालावशकरीइचीमूर्ती ॥७५॥
काशीयशोनुकीर्तन दशशतवदनासहीनहोयाचें ॥
तद्वर्णनींकधींतरि होइलसामर्थ्यकायहो याचें ॥७६॥
काशीनामोच्चारहि वदनींयेतांअसंख्यनरतरले ॥
यास्तवयेइलतैसें मन्मनतद्वर्णनासितरतरलें ॥७७॥
गंगापश्चिमतीरीं श्रीमत्काशीविमुक्तिपुरविलसें ॥
आयकिलेंनदुजेंपुर ऐसेंइहपरसुखासिपुरविलसे ॥७८॥
नवखंडाभूमिपरी काशीहेंहोयदाहवेंखंड ॥
भवरोगदाहकरिजें शूलाचाजेविंदाहवेंखंड ॥७९॥
धारणजिचेंकराया शक्तनसतिकूर्मतोअहिअनंत ॥
राहेशिवत्रिशूलीं यास्तवहोतोजिचानकधिअंत ॥८०॥

पापकरणाऱ्यास काशीवासानेंच मुक्ती होईल कीं नाहीं.

यद्यपिपापकरीनर काशीवासेंचिपावतोमुक्ती ॥
ह्मणतीकितीकऐसें परिकेवलअर्थवादहेउक्ती ॥८१॥
तारकधर्माचरणचि केवलतारकजनानसेजागा ॥
यास्तवधर्माचरणीं मुख्यत्वेंलोकहाअसोजागा ॥८२॥
इतरत्रपापकेलें नाशेसुक्षेत्रदर्शनानें तें ॥
सुक्षेत्रींकृतपापा श्रीकाशीवसतिहीलयानेते ॥८३॥
परिजेंकाशींतघडे चिकटेतेंवज्रलेपसेंआंगा ॥

---

१ शेषास २ एक औषधी ३ सर्प ४ निवडुंगाचे चिकाचालेप.

सिद्धांतहाचिअसतां काशीवासेंचिनरतरेसांगा ॥८४॥
होउनिरतस्वधर्मीं काशीनगरींनिवासजरकरशी ॥
त्वत्कृतितरचिमनुजा प्रियदेवातेंदुधांतसाखरशी ॥८५
वाराणसींतराहुनि दुष्कर्मातेंकरीलजरिनरकां ॥
कथितोंचिनिश्चयानें नलगेप्रार्थावयासितरि नरका ॥८

याक्षेत्रांत मुख्य देवता.

वाराणसीपुरीचा नृपतिंअसेअष्टमूर्तिशंकरतो ॥
ज्यातेंचित्तींठेउनि संसारींलोकहाविशंकरतो ॥८७॥
विश्वेशविष्णुविघ्नप नुरवितिअघदंडपाणिभैरवही ॥
काशीगुहाहिगंगा दुर्गामणिकर्णिकातशालेवही ॥८८॥
प्रतिदिनियांचेंदर्शन घेतीकाशींतसाधुजेवसती ॥
कींयापुरींनदुसरीं प्रमुखअशींहींचदैवतेंअसती ॥८९॥

यात्रा.

पंचक्रोश्यंतर्गेह उत्तरदक्षिणहिमानसासिजन ॥
अष्टविनायकयात्रा करितोदीनांसिअर्पितातिधन ॥९०॥
जेथेंईशकृपेनें जनअसती सर्वदाहि संतुष्ट ॥
स्वाद्वन्नअन्नपूर्णा देउनिअवघ्यांसिठेवितेपुष्ट ॥९१॥
क्षुधितअसेंमीऐसा शब्दचिऐकावया न ये कानें ॥
कींअन्नसत्रतेथें दीनजनांठेविलेंनएकानें ॥९२॥

---

१ किंचितही.

निर्द्वंद्वानिर्वैरा सुखरूपानांदतेप्रजासारी ॥
कोठेंभोजनगायन नृत्यकुठेंखेळतीस्त्रियासारी ॥९३॥

घरें.

केवळपाषाणाचीं शोभतिलक्षावधीजिथेंसद्में ॥
ज्यांभंवतींजलपूरित परिखात्यांमाजिंफूलतींपद्में ॥९४॥
काष्ठनमिळेचियास्तव दगडाच्याबांधितीजनघरांस ॥
वस्तूंचीदुर्लभता शिकवीचातुर्यअधिकचिनरांस ॥९५॥
काढितिपाषाणावरि कुसरीकाष्ठींहिजीनकरवेल ॥
चित्रेंपरोपरीचीं ज्यांतेंपाहूनिबुद्धिहरवेल ॥९६॥
भिंतीभूमिकपाटें खांबाहितुळयाअडेंजिनेमाडच्या ॥
सर्वहिपाषाणांचीं मिळतीतैशाचिकींशिलाजाडच्या ॥९७॥
साधारणागृहाही मजलेअसतीचजेथपांचसहा ॥
कितिसांगूंकाशीतें जनहोजन्मूनिएकवेळपहा ॥९८॥

बायका.

व्हायास्वकांतिअधिका चंद्रेंहीयन्मुखासिचाटावें ॥
ऐशानागरललना राहतिनेसूनिजेथपाटावें ॥९९॥
ज्योत्स्नाभ्रमासिदेस्मित ज्यांचेंचतुरानरांसहीदिवसा ॥
त्यांतेंरात्रींपाहुनि नकसाहोईलचंद्रमाहिंवसा ॥५००॥

लोकांची रीति.

शिशिरींशीतग्रीष्मीं उष्णाहितैशींशिलागृहेंहोती ॥

१घरें २खंदक ३नागरांच्या स्त्रिया ४शालू पैठण्या वगैरे ५चांदणें ६ हसणें ७ लज्जित.

यास्तववासकराया लोकांतेंबहुतदुःसहचिहो तीं ॥५०१॥
तळघरिंराहुनिदिवसा गच्चिवरीनिजुनिकाढितातिनिशा ॥
स्वांताशांतकराया भांगेचीकारितिसर्वलोकनिशा ॥२॥
नगराभंवतींसुंदर असतीआरामपुष्पफलतरुंचे ॥
द्राक्षाजातिलताहीं शोभतितैसेचिताटवेसुरुंचे ॥३॥
शोभतिरमणीयगृहें ज्यांभंवतींउडतिउंचकारंजीं ॥
वाळ्याचेपडदेही स्थलऐसेंनरमनानका रं[१]जी ॥४॥
राहतिजाउनितेथें स्वस्त्रीबालांसहीतधनवंत ॥
रमतीअत्यानंदें ग्रीष्मऋतूचानहोयजोंअंत ॥५॥

काशींतील विद्या व कला.

विद्याधनेच्छुनरजरि तरिदेवाराणसींतजननसती ॥
प्रार्थोंभवानिलाकीं ऐसेंइतरत्रविदु[३]रजन नसती ॥६॥
काशीपुरींतपूर्वी अवध्याप्रत्यक्षदेवताहोत्या ॥
येतांकलियुगसंप्रति झाल्याअंतर्हिताचिजनहो त्या ॥७॥
देवाशिवादिशिलामय झालींगंगादिदैवतेंपाणी ॥
साक्षाद[४]क्षररूपा विद्वद्वदनांतपरिअसेवाणी ॥८॥
शास्त्रत्रिभुवनलोचन तैसेंअतिमधुरगानयाचिपया ॥
भरुनीस्वस्तनयुग्मीं होउनिचित्तींसरस्वतीसदया ॥९॥

---

१ चित्तातें २ रंजवी, हें क्रियापद कोठें कोठें सकर्मक ही आढळतें. ३ विद्वान ४ अविनाशरूपादेवी.



सोडोनिस्वपित्यातें देवीवाराणसींततीआली ॥
स्वार्भकतुल्याकाशी-वासिजनांदुग्धपाजितीझाली ॥१०॥
सांगश्रुतिषट्शास्त्रें अन्नपचनगाननर्तनादिकला ॥
काशीस्थसर्वजाणति वाटेविश्वेशत्यांस्वयेंविकला ॥११॥
काशीस्थशिल्पिजनअति कौशल्येंरत्नभूषणेंजडती ॥
यच्चातुर्यविलोकुनि तत्कर्मचतुरमनांतचडफडती ॥१२॥
गुणह्मणुनिवर्णनीया यद्यपितीहोयचोरवल्लीला ॥
बहुमूल्यरत्नसें ते जनदावितिकरुनितारमल्लीला ॥१३॥
पूरितसुवर्णसूत्रें वस्त्रेंअतिसूक्ष्मतंतविंबहुवर्णी ॥
निघतीकाशीमध्यें ज्यांचेंसौंदर्यकोणहोवर्णी ॥१४॥
फारचिमार्गअविस्तृत काशीनगरांतएवढेंन्यून ॥
ज्यांतुनिजाऊंनशके रथगजवाजीवरीहिबैसून ॥१५॥
जेथेंतेथेंबसती वाणीमांडूनिवस्तुनिकरास ॥
हेंघ्याहेंघ्याह्मणती येतांलोकांसिजोडुनिकरास ॥१६॥
यास्तवजावेंनलगे लोकांअतिदूरसोडुनिघरांस ॥
मिळतेंगृहासमीप स्वल्पायासेंचिइछितनरांस ॥१७॥
गांगसहितदधितक्रा सेवितिनिर्दोषह्मणुनिआपणगा ॥
स्वर्गस्थदेवह्मणती येउनिझालेंकृतार्थआपणगा ॥१८॥

---

१ चोरासारिखें आचरण २ खोटा हिरा ३ कलाबतूनें ४ बाजारातील.

नानाधर्माश्रितहे द्विजजिनयवनादिकस्वधर्मातें ॥
रक्षणकरोनिकरिती बहुविधउपजीविकार्थकर्मातें ॥१९॥
अमुचाचिधर्मउत्तम ह्मणुनीअन्योन्यकरितितेखटला ॥
व्यर्थचिसर्वांधर्मी आहेविश्वेशएकलानटला ॥२०॥

श्मशान.

काशीनगरीसदुजें नामविलक्षणमहाश्मशानअसे ॥
आहेकृतीचतैसी ह्मणुनीमिथ्याजनांनवाटतसे ॥२१॥
थोरअसेजनसंख्या प्रतिदिवसींमरतिलोकहोबहुत ॥
अल्पाश्मशानभूमी सर्वप्रेतेंनहोतिपूर्णहुत ॥२२॥
शवदाहकरायाकर द्यावालागेचितीव्रडोंबाचा ॥
एकजळेतोंदुसरें आणितिशवकरितशब्दबोंबांचा ॥२३॥
अर्धचिदग्धशवातें लोटितिउदकींधनार्थतेदुष्ट ॥
मांसेच्छेनेंत्यांवरि बैसतिगंगाजलांतबलिपुष्ट ॥२४॥
आशीवरुणामध्यग पंचक्रोशीअसेपहादेश ॥
प्रेतातेंनचभक्षिति तेथेंजरिराहताति यांदेश ॥२५॥

गंगातीराची शोभा.

ऐशीहीजरिकाशी गंगेवांचूनिशोभलीनसती ॥
धृतभूषणासुरूपा कुंकुमरहिताजशीभली न सती ॥२६॥
काश्यवलोकनकामा त्यक्तरयांजाह्लीस्थिरागंगा ॥

१कावळे २ मोठालेनक्रादि जलचर ३ वेग.

काशीवासननाशी तत्क्लेशानाशिजीधुतांअंगा ॥२७॥
यास्तवकाशीवासी तुझियाउदकींस्वदेहलोळविती ॥
शून्यस्वगेहझालें ह्मणुनिकृतांतास्वहस्तचोळविती ॥२८॥
गंगातीरींशोभति घाटांच्यासततहारिच्याहारी ॥
करितीस्वकर्मत्यांवरि बैसुनिविप्रादिवर्णहेचारी ॥२९॥
दिसतेंप्रातःकाळीं श्रीगंगेचेंसुतीरविप्रमय ॥
कलियुगइतरत्रपरी येथेंअद्यापिहोयकृतसमय ॥३०॥
आशीदशाश्वमेधहि तैशीमणिकर्णिकासुकीर्तीही ॥
गंगापंचकवरुणा अघनाशकहोयपंचतीर्थीही ॥३१॥
तेद्रव्यसाध्यवाजी-मेधह्मणुनिसोडिलेचिरंकांनीं ॥
परित्यांदशाश्वमेधीं स्नानकरुनिजोडिलेअशंकांनीं ॥३२॥
विष्णवरिनिर्मितझाली ह्मणुनिजिलाह्मणतीचक्रपुष्करणी॥
त्यावरिगंगाहिअली विख्यातजगत्रयींजिचीकरणी॥३३॥
गंगापुत्रह्मणतिकरि सक्षौरस्नानचक्रपुष्करणी ॥
हेपुरुषार्थदअसतां भटकरितिकशासदेहशुष्क रणीं॥३४॥
गंगामहिमापाहुनि शिवहस्तभ्रष्टहीरमणिझाला ॥
ह्मणुनिमणिकर्णिकाहें, नामजहालेंतशांततोन्हाला ॥३५॥
यवनांचियाभयानें ह्मणतीमणिकर्णिकेंतशिरलाहो ॥
श्रीशिवविडंबनचिहें सत्यअसेकींत्वदंबु शिर,लाहो॥३६॥

---

१ यमाफ़रवी २उत्तम कीर्तीची ३ पंचगंगा ४ अश्वमेधास ५ चक्र ६ यो॒द्ध

गंगायमुनादुसरी तिसरीतैशींसरस्वतीपाही ॥
किरणाहिधूतपापा पांचनद्याह्मणुनिपंचगंगाही ॥३७॥
फलकायपंचगंगास्नानेंलोकांसिहेंजयाज्ञान ॥
आहेतोनित्यकरी मुख्यत्वेंत्यांतकार्तिकस्नान ॥३८॥
दीपांतेंप्रज्वालुनि करितीअवघेहिउज्वलितघाट ॥
गंगास्नातनरांतें स्वर्गाचीदावितीचतेवाट ॥३९॥

बुढामंगळ सणाचा खेळ.

फाल्गुनिककृष्णपंच-म्युत्तरयेईलजोसुकुंजवार ॥
ह्मणतिबुढामंगलत्या यद्रात्रींलोकखेळतीफार ॥४०॥
रंगवितीबहुनौका ध्वजरोंवितिलावितीतशाकेळी ॥
उभवितिवस्त्रगृहांतें बैसुनित्यांमाजिकरितिजनकेली॥४१॥
भोजनफलाहरादिक गायनतैसेंचिनर्तनहिसंतत ॥
इत्याद्यानंदातें करितीतेसर्वरात्रजनसतत ॥४२॥
बहुविधअग्निक्रीडा करितीगंगेवरीगुलालातें ॥
उडवितिकाशीवासी घालवितिसुखेंचिरात्रिकालातें॥४३॥
आधींविधुखंडाकृति त्यांतगुलालेंसुलोहिताझाली ॥
वाटेकाशीनगरी ल्यालीहेंकुंकुंआपुल्याभाळीं ॥४४॥
आहेप्रचारशुक्ला ज्येष्ठींएकादशीमहापर्व ॥

---

१ नदी विशेष २ मंगळवार ३ काशींत या मंगळवारास बुढा मंगल ह्मणतात. ४हुटी ५ क्रीडा ६ तत ह्मणजे वीणादिवाद्यतत्सहित हे गायनादिकाचें विशेषण ७दारू काम ८ चंद्रखंड ९ तांबडी १०

येतांतरोंनिजाती घेउनियांगोवृषादिजनसर्व ॥४५॥
नक्रादिजीवघातुक राहेगंगेंतपरिनत्याशिवतो ॥
जीववधकर्मअपुलें तेंदुसऱ्यातेंकरूं न दे शिव तो ॥४६॥

दशहरा.

मोठाचिदशहरोत्सव श्रीमद्भागीरथीतटींहोतो ॥
गंगास्तवपठणातें स्नानादानासिनरकरीजोतो ॥४७॥
स्वर्णाचेरौप्याचे कच्छपमीनादिकरुनिपिष्टाचे ॥
गंगाजलांतसोडिति कींयेणेंलाभहोतिइष्टाचे ॥४८॥
देतीभोज्यअंवारित पाहतिनचउच्चनीचभेदातें ॥
होईलद्रव्यव्यय नाणितिकधिंहेंमनींचभे,दातें ॥४९॥
नारीसौभाग्यवती गंगेचीभरुनियांचितीओटी ॥
पुत्रनकोत्वांद्यावी त्वत्समकन्याचिआमुचेपोटीं ॥५०॥
ऐसेअनेकउत्सव गंगाप्रीत्यर्थलोककरितात ॥
तैसेंपूजादिकही करुनीगंगाप्रसादवरितात ॥५१॥
पूजाघेउनिगंगा होउनिसंतुष्टत्याजनांवरती ॥
सोडुनियांकाशीतें होयपुन्हांआपुल्यापथावरती ॥५२॥

काशीहून गंगा निघाली.

निघतांगंगादेवी पुसत्येकींउचलुनीस्वलहरिकरा ॥
येतेंह्मणोनिसर्वां काशीनगरीस्थदेवनरनिकरा ॥५३॥

---

१ मुक्तद्वार.

गंगेशीं इतर नद्यांचे संगम.

काश्युत्तरसीमाजी वरुणातिजलांहिघेउनीसंगें ॥
भेटायासिसमुद्रा त्वरितनिघालीसतेथुनीगंगे ॥५४॥
तेथुनिअनेकतटिनी नामेंअसतीप्रसिद्धज्यालोकीं ॥
गंगासंगमपाउनि मानितित्याधन्यआजिजालोंकीं ॥५५॥
इतरांमहानद्यांसीं अपुल्यामहिमेंकरूनिजीतुळते ॥
श्रीमद्भागीरथितें तीसुप्रख्यातगोमतीजुळते ॥५६॥
गंगेंततेहिविरली नामानेंह्मणतिघोगराजीला ॥
लाजवि तिलाअपावन ओघतिचाजेविंभोगराजीला॥५७॥
सरयूनामेंपूर्वी लोकींविख्यातहेंनदीहोती ॥
तत्तीरींचअयोध्या--नगरीकवणानठाउकीहो ती ॥५८॥
हर्यंशहिरामादिक--रविकुलभवनृपतितज्जलींन्हाले ॥
परिगंगेसमिळेतों तज्जलतैसेंपवित्रनचझालें ॥५९॥
यद्गतपाषाणाच्या देवाच्यामूर्तिउत्तमाहोती ॥
ऐसीगंडकितटिनी गंगेंताचिलीनजाहलीहो ती ॥६०॥
भ्रातृगुणाअत्युग्रा गंगाभिमुखाचिकौशिकीधांवे ॥
परिहीवसिष्ठतुल्या शांतापाहूनिविरतितेंपावे ॥६१॥
भोगावतीहिमिळुनी गंगेलाख्यातजरिजगींआहे ॥
स्वातंत्र्यात्यागुनियां गंगापरतंत्रहोउनीवाहे ॥६२॥

---

१ नदी विशेष २ नदी ३ अपवित्र ४ सर्पदेह ५ निर्विष सर्प-दुतोंडें ६ बंधु विश्वामित्र तद्गुण।
७ नदी विशेष * घोगरा नदीला × घोगरा नदीचा ॥ घोगरा नदी.

पावोनिराम[१]गंगा गंगेतेंशांतजाहलीजैसी ॥
प्रख्यातमहानंदा त्वरितचियेवोनिभेटलीतैसी ॥६३॥
होतेंसुकर्मनाशन यत्स्पर्शेंह्मणुनिहोयतन्नाम ॥
घेईलकर्मनाशा लाजुनिगंगेंतकेंविंनविराम ॥६४॥
यद्यपिअवघ्यालोकीं आहेविख्यातनामनदशोण ॥
गंगासंगमहोतां त्याचेंअभिधानजाणतोकोण ॥६५॥
जैसेंअधीश्वरातें[२] राजेसामंत[३]अर्पितातिकर ॥
गंगेतेंकररूपा स्वोघातेंअर्पितीनदीनिकर[४] ॥६६॥
मिळतांमहानद्या[५] या गंगेचेंपात्रवाढलेंभारी ॥
ग्रीष्मऋतूंतहियद्वत कींअतळस्पर्शजाहलेंवारी ॥६७॥

पाटनाशहर.

जेथेंएक्यायवनें[६] हूणातेंभोजनार्थबाहूनी ॥
वधिलेंतरींमरेतों युद्धचिकेलेंअशस्त्रबाहूनीं ॥६८॥
ऐशाअनेककर्मा--विषयींप्रख्यातपाटणानगरी ॥
आहेतिकडेजाया नंतरगंगाप्रवाहमार्गधरी ॥६९॥
गंगाचरित्रकथन श्रवणेच्छाहीकधींनसंपेल ॥
बहुवारहुंगितांही तृप्तीतेंकरिलकायचंपेल[७] ॥७०॥
गंगोभयतीरींही-नगरेंदेवालयेंकितीक्षेत्रें ॥

---

१ नदी विशेष २ सार्वभौम राजातें ३ मांडलीकराजे ४ समुदाय ५ मोठ्या नद्या ६ मुसलमानानें ७ सोनचांफ्याचें तेल.

ज्यांचेंवर्णनकरितां श्रमतिमुखेंयदवलोकनेंनेत्रें ॥७१॥

समुद्रास मिळण्याची गंगेची उत्कटइच्छा.

यास्तवगंगाकैसी मिळतेजाऊनियांसरित्पतिला ॥
वर्णनतेंचिकरूंहो जैसेंप्रेरिलगणेशमन्मतिला ॥७२॥
जेव्हांनीटनिघाली गंगाभेटावयासमुद्राशी ॥
ओघासहस्त्रधाकरि अपुल्यात्यांधावयास मुद्राशी ॥७३॥
चिरदृष्टप्रियपतिसीं केविंकथावेंरहस्यवचनांस ॥
एकमुखेंह्मणुनिधरी ओघमिषेंतीसहस्त्रवदनांस ॥७४॥
धरिलेंप्रवाहरूपें कींगंगेनेंसहस्त्रहस्तांस ॥
पतिपरिरंभेंयुगपत् न्या याचिरविरहदुःखअस्तास ॥७५॥

गंगेंतीलबेटें.

दोहोंकडूनजातां ओघद्वय,होतिथोरलींबेटें ॥
यद्वतवनीन रातें फिरतांवनपशुसमूहहीभेटे ॥७६॥
भागीरथीसदेतो प्रत्यब्दींपूरवर्षऋतुकाळ ॥
अवघ्याद्वीपांमध्यें तेणेंयेऊनिसांचतोगाळ ॥७७॥
यास्तवत्याभूमिवरी बहुविधउत्पत्तिधान्यजातीची ॥
होतेअन्याभूमिस कैसीयेईलयोग्यतातीची ॥७८॥
तद्वततरुचास्वाभा--विकउष्णऋतूंतवर्णजोहिर वा ॥
ह्मणतोआरामस्थां तरुंलापाहुनिमळास्वमदजिरवा ॥७९॥

---

१ समुद्राला २ सागरातें ३ मुत्--राशी प्रीत्यतिशय.



कलकत्तानगर.

आलीयदर्थगंगा भूमिवरीमेरुपर्वतांवरुन ॥
होउनिभगीरथावरि बहुतचिसंतुष्टतत्तपेंकरुन ॥८०॥
उद्धारसागरांचा मुख्यअसेंकर्महेंचियालोकीं ॥
गंगेचेंनृपतिमुखें ह्मणवावेंतेविंधन्यझालोंकीं ॥८१॥
कपिलाश्रमस्थलहितें जवळचिआहेजयासिजनसर्व ॥
कलकत्तायानामें जाणतिहरिजेंसमस्तपुरगर्व ॥८२॥
आहेसर्वांहूनी गंगेचाओघएकचिप्रमुख ॥
मोठयावेगानेंतो करुनीतिकडेचिचालिलास्वमुख ॥८३॥
सर्वमहाराष्ट्रांचें जनपालनकर्महोतसेजेथें ॥
हूणस्थापितमुख्य--प्रतिनिधिकींराहतोस्वयेंतेथें ॥८४॥
गंगापूर्वतटींपुर पूर्णअसेहेंमनोज्ञसदनांनीं ॥
दिधलेंनामचित्यातें यास्तवकींहर्म्यपत्तनजनांनीं ॥८५॥
ज्याचींशाखानगरें मुंबापुरतेविंहोयमद्रास ॥
संपादूनिजयातें हूणनृपतिपावलेसुभद्रास ॥८६॥
सागरसुदूरतेथुनि वस्तुसुपूरितह्मणोनिनौकांतें
न्यायायानगरातें गंगौघचिमार्गहोयलोकांतें ॥८७॥
नौकारोहणकरुनी गंगौघांतूनिलोकयेतात ॥
जेव्हांपुरोपकंठीं शोभापाहूनिचकितहोतात ॥८८॥

---

१ मोठ्या वाड्यांचें नगर. २ चांगलें कल्याणास.

गंगातीरींबहुतचि सुंदरसदनांसपुष्पितवनांस ॥
दाउनियांजनदेती अपुल्यानिर्वाच्यतोषनयनांस ॥८९॥

सागरांचा उद्धार.

जेथेंकपिलक्रोधें सगरसुतांलागिंभस्मसात्केलें ॥
त्यांतेंअमृतकराया गंगामृतत्यावरूनियांगेलें ॥९०॥
उद्धारपूर्वजांचा झालापाहुनिभगिरथहिराजा ॥
धन्यस्वजन्ममानी कींयत्नेंसाधिलेंमहाकाजा ॥९१॥
पित्रुद्धारार्थचित्वां आणिलीगंगाभगीरथाराया ॥
होसीपरंतुकारण तूंआतांसर्वलोकताराया ॥९२॥
उद्धारसागरांचा करुनीतेथेंनराहिलीगंगा ॥
स्वागमनहेतुसरतां सत्वरगेलीचउदधिच्यासंगा ॥९३॥

गंगेस समुद्राचें सामोरें जाणें.

प्रकटकसेंतरिजावें स्त्रीसंमुखह्मणुनिसागरामृतदा ॥
येतांमिषभरतीचें करुनीसागरपहानिघेचतदा ॥९४॥

गंगासागर संगम.

कल्लोलअद्रितुल्यहि उठतीगंगाब्धिसंगमस्थानीं ॥
जाणोदांपत्यकलह होतीहेंमानिलेंनभःस्थानीं ॥९५॥
क्रीडाकरितांपतिसीं झालीभागीरथीदिसिनासी ॥

१ भस्मरूप २ मुक्त ३ समुद्रात अमृत ह्मणून मधुर उदक देणारी, पक्षीं मुक्ति देणारी गंगा ४ मोठ्यालाटा ५ स्वर्गस्थ देवांनीं

गेलींमत्पापेंही ढुंढीस्मरणेंचिविघ्नसेनासी ॥९६॥
प्रतिपदिंवृद्धअखंडहि गंगेतवओघचालिलाजैसा ॥
भक्त्यभिनिवेशमाझा वाढोतुझियापदांबुजींजैसा ॥९७॥

मंगलाचरण पूर्वक प्रार्थना.

नलगेदुसरेंकांहीं जावाहादासढुंढिलोकातें ॥
इतुकेंचिदेइंमाते गंगेतूंयात्वदीयतोकातें ॥९८॥
ऐसाहागंगास्तव कुसुमांजलिअर्पिलागणेशपदीं ॥
यद्यप्यशुद्धआहे येणेंहोतुष्टतोमलासंपदी ॥९९॥
कैसेंतरीह्मणावें कींयामत्कृतिसलोकहोवाचा ॥
परिह्मणतोंचिजनातें कींगंगानामयेतसेवाचा ॥६००॥

ग्रंथ समाप्तीचा शक.

चैत्राद्यदिनींगुणनिधि मुनिचंद्रींशालिवाहनींशाकीं ॥
प्राजापत्याब्दींहा ईशकृपेंग्रंथपूर्णझालाकीं ॥६०१॥

---

समाप्त.



१ श्रीगणेश २ मुलातें ३ त्वरित.

# निबंध.

हें सर्वांस ठाऊकच आहे, कीं कविता दोन प्रकारची, एक गद्यात्मक, व दुसरी पद्यात्मक; ज्या कवितेस छंद ह्मणजे अमुकच अक्षरें व मात्रा असाव्या, तसेंच गणादि नियम असावेत; त्यास पद्यात्मक कविता ह्मणतात; आणि या नियमावांचून जें वाक्य त्यास गद्यात्मक कविता ह्मणतात. आपण जें साधारण बोलतों त्यास गद्यात्मक कविता ह्मटलें तरी चालेल. यावरून हें स्पष्ट आहे कीं, गणमात्रादिकांचा नियम नसल्यामुळें, गद्यात्मक कविता सुलभ होय; व हे नियम असल्यामुळ पद्यात्मक कविता करणें फार अवघड झालें आहे. कारण कोणच्याही अनीयमित गोष्टीच्या अंगीकारापेक्षां नियमित गोष्टीचा अंगीकार करणें प्रायः कठीण आहे. यावरून प्रथमतः जेव्हां लोकांचे मनांत कविता करण्याची इच्छा जाहली, तेव्हां तिचें जन्म गद्यरूपांत होऊन पुढें लोक जसे जसे ज्ञानविशिष्ट होऊं लागले तशी कवितेला पद्यरूपता प्राप्त जाहली; हें सांगण्याची जरूर दिसत नाहीं. परंतु ही गोष्ट लौकिक कवितेपुरतीच ह्मटली पाहिजे, कारण आमचे भोळ्या मताप्रमाणें अनादि सिद्ध ईश्वरापासून उत्पन्न, व सुधारलेल्या आलीकडील मताप्रमाणें आर्यलोकांचा अतिप्राचीन काळचा ग्रंथ कीं ज्या सुधारलेल्यांसही याहून जुना ग्रंथ कोणता हें सांगतां येत नाहीं. इतका प्राचीन ग्रंथ जो वेद तो प्रायः जगती, पंक्ति, त्रिष्टुप्, अनुष्टुप्, गायत्री, इत्यादिअनेक छंदांनीं बद्ध आहे. ही गोष्ट आह्मांस ह्मणजे वेद अनादि सिद्ध मानणाऱ्या भोळ्यांस ईश्वराचे ठायीं अचिंत्य शक्तित्व असल्यामुळें आश्चर्यावह होणार नाहीं. तथापि इतक्या प्राचीन काळीं जेव्हां पृथ्वीवरील सर्व भागांत लोक अज्ञान निद्रेंत स्वस्थ होते, तेव्हां आर्य लोकांनीं, अत्यंत ज्ञान संपन्न लोकांनींच करण्यास योग्य, अशा नानाविध छंदांनीं बद्ध, व अनेक ज्ञानप्राप्तिकर इतिहासांनीं युक्त असा वेदरूप पर्वतप्राय अक्षर समाम्नाय प्रथमतः कोणताही गद्यात्मक ग्रंथ नकरितां, एकंदर पद्यात्मकच करून आपला ज्ञानध्वज पृथ्वीवर रोंविला; हें पाहून आलीकडील सुधारलेल्या लोकांनीं तोंडांत बोटेंच घातलीं पाहिजेत. ही पद्याची गोष्ट झाली. आतां गद्यात्मक कविता जी फार सोपी ह्मणून मी सांगितलें आहे तें तरी आधुनिक गद्यात्मक कवितेविषयींच जाणावें, पूर्वकाळीं ऋषिप्रणीत सूत्रादि गद्यात्मक ग्रंथाचा विचार केला असतां गद्यात्मक ग्रंथास सोपें ह्मणणें हें अप्रशस्त आहे, असें ते ग्रंथ पाहिले असतां कोणीही ह्मणेल. सूत्राच्या लक्षणाची एक कारिका अशी आहे कीं:—

अल्पाक्षरमसंदिग्धंसारवद्विश्वतोमुखं ॥
अक्षोभ्यमनवद्यंचसूत्रंसूत्रविदोविदुः ॥१॥

अर्थ, विवक्षितार्थाची सिद्धि होण्यास जितक्या अक्षरांची अवश्यकता असेल तितकींच अक्षरें असावींत, ह्मणजे या वाक्याचा अर्थ "असा, कीं तसा" असा संदेह होऊं नये, इतका स्पष्टार्थ असावा. व्यर्थ अक्षरें नसावीं. अपशब्द नसावेत. सारवत्, विश्वतामुखं, हीं दोन विशेषणें फक्त शास्त्रांतील खटपटीचीं असल्यामुळें यांचा अर्थ येथें लिहिण्याचें प्रयोजन दिसत नाहीं. इत्यादि गुणांनीं युक्त जो गद्यात्मक ग्रंथ त्यासच सूत्र ह्मणावें. पहा कीं अशा तऱ्हेचा ग्रंथ करणें दूरच; केवळ हें लक्षण मनांत आणिलें ह्मणजेच मन गोंधळून जातें. धन्य ते सूत्रकार; केवढें हो तरी त्यांचें व्यापक व विशाल ज्ञान! श्रीव्यासकृत् वेदांत सूत्राचा विचार केला असतां त्यांचें ज्ञान पाहून चित्त थक्क जाहल्या वांचून कोणी तरी राहील? तसेंच व्याकरणाचा सूत्रकर्ता पाणिनी, ज्या महापुरुषानें आठ अध्याय संख्यात्मक सूत्र ग्रंथानेंच सर्व संस्कृत सागरांतील शब्दरूप माशावर जाळें पसरलें; ज्यास मनांतील अर्थ प्रकट करणाऱ्या वाक्यांत एक मात्रा कमी जाहली तर पुत्रोत्साहाचा आनंद व एक मात्रा अधिक जाहली असतां महद्दुःख होतें. असे मितभाषणी त्यांच्या ग्रंथास हा गद्यात्मक ग्रंथ ह्मणून करण्यास सोपा असें असमंजसा वांचून कोण ह्मणेल? असो; साधारण विचार केला असतां गद्यरूप कविता पद्यरूप कवितेहून कांहीं अंशीं सुलभ आहे; तथापि कोणतीही कविता सरस करणें किती दुर्घट आहे, हें सुज्ञास कळल्या वांचून राहणार नाहीं. आतां या दोन प्रकारच्या कवितेस सरसत्व येण्यास मुख्य दोन गोष्टी पाहिजेत. एक भाषा उत्तम सुधारलेली, दुसरें कवि उत्तम असला पाहिजे. या लिहिण्यानें उत्तम सुधारलेल्या भाषेचीं, व उत्तम कविचीं लक्षणें सांगणें प्राप्त जाहलेंच. प्रथमतः व्याकरण उत्तम असणें, नानाप्रकारच्या दृष्टादृष्ट पदार्थांस नांवें असणें, शब्द कठोर व मृदु अशा दोन जातीचे असणें, व अनेक विषयांवर ग्रंथ असणें, भाषा मृदु ह्मणजे पाहिजे तशी लवणारी असणें, इत्यादि गुणयुक्त जी भाषा ती उत्तम भाषा होय. व्याकरणादि शास्त्रें, अनेक कोश, तशींच अनेक काव्यें, यांचें ज्ञान असून नित्य अभ्यास, बहुश्रुतपणा, कविता करण्याची इच्छा व त्या विषयीं नित्य अभ्यास, नानादेश पर्यटण, इतके गुण असून या सर्वांवर ईश्वरदत्त कविता शक्ति असणें इतके गुण ज्याचे अंगीं असतात, तो उत्तम कवी ह्मटला पाहिजे. इत्यादिगुण भाषेत किंवा कवींत असणें केवळ अशक्यच आहे. तेव्हां एवंगुणविशिष्ट एकादी भाषा किंवा कवी आहे, अथवा हे गुण काल्पनिक ह्मणावयाचे, ही शंका सहजच येते; या शंकेचें समाधान सांगणें ह्मणजे संप्रति नानाविध ज्या भाषा व जे कवि ठाऊक आहेत; त्यांची तुलना करून ज्या भाषेत व ज्या कवींत हे गुण मिळतील त्यास पुढें करणें हें होय. आमच्या देशांत मानवी जातीचें बहुत्व असल्यामुळें भाषेचेंही बहुत्व जाहलें आहे. त्यांत मुख्य भाषा ह्मणजे संस्कृत, महाराष्ट्र, कर्नाटकी, तैलंगी गुजराथी इत्यादि. यद्यपि भाषा बहुत आहेत, तथापि हे सर्व संस्कृताचे पोट

भेद असल्यामुळें, एका संस्कृत भाषेच्या विचारानें इतर सर्व भाषा गतार्थ होतात, ह्मणून वरील सर्व भाषांतून प्रकृत विचारास संस्कृत तेवढी घेऊं. दुसऱ्या आरबी, पारशी, ऊर्दु, हिंदुस्थानी, रांगडी इत्यादि भाषा, आरबी व पारशी भाषेचे भेद असल्यामुळें, या दोन भाषांच्या ग्रहणानें, इतर भाषांचा निर्वाह होईल. एकूण संस्कृत, आरबी, पारशी, या तीन व चवथी अलीकडील फार सुधारलेली इंग्लिश या चार भाषांची परस्परांशीं तुलना केली असतां, पृथ्वींतील भाषांची सरासरी तुलना झाली ह्मणण्यास नड दिसत नाहीं. आतां आरबी, पारशी, इंग्लिश, या भाषांतही संस्कृत शब्दांचे अपभ्रंश पुष्कळ सांपडतात. तथापि या भाषांचीं रूपें संस्कृत भाषेहून अगदीं भिन्न दिसतात. यामुळें या तीन भाषांस संस्कृताचे पोट भेद असें ह्मणतां येत नाहीं. इतकेंच कीं, या सर्वभाषांपेक्षां संस्कृत भाषा प्राचीन, हें निश्चित करण्यास मात्र हा पुरावा बस आहे. या भाषांवांचून ल्याटीन, ग्रीक, जर्मनी व फ्रेंच. या भाषा चांगल्या सुधारलेल्या आहेत; असें ऐकीव आहे. तथापि त्या भाषांचें स्वरूप देखील माहीत नाहीं. तेव्हां त्यांचा विचार दूरापास्तच होय. शेवटीं विचारार्ह संस्कृत, इंग्लिश, आरबी, पारशी, अशा चार भाषा आहेत असें सिद्ध झालें आहे; त्यापैकीं इंग्लिश, आरबी, पारशी ह्या तीन भाषा परकीपणाला सारख्याच, ह्मणून या तिन्ही एक व संस्कृत एक असे दोन पक्ष करून सर्वांची तुलना करण्या पूर्वी, इंग्लिशादि तीन भाषेंत न्यूनाधिक्य भाव काय आहे हें सांगून नंतर चौघींची ही परस्परांशीं तुलना करावी हें बरें दिसतें; ह्मणून प्रथम त्यांचें विवेचन करितों. आरबी व पारशी या दोन भाषा यवनांच्या असून आरबी, पारशींपेक्षां प्राचीन आहे. प्रत्येक भाषेचा पाया, तसें गांभीर्य व प्रौढता, येण्यास मुख्यकारण जें व्याकरण तें या तिन्ही भाषांचें एकाच स्वरूपांत आहे. मात्र आरबी भाषेंत संस्कृता प्रमाणें एक वचन, द्विवचन नंतर बहुवचन इतकाच भेद आहे. अनेकविध नामसंग्रहांत इंग्लिश भाषेपेक्षां इतर दोनही भाषा मागेंच आहेत. आतां या दोहों भाषेंत जरी नामें थोडीं आहेत, तरी स्वतः सिद्ध आहेत. इंग्लिश भाषेसारखीं अन्य भाषेंतून घेतलेलीं नव्हेत, परंतु हें प्रकृत विषयास लागू नाहीं; ह्मणून एकंदरींत नामाधिक्यास्तव हा गुण इंग्लिश भाषेलाच दिला आहे. भाषेला मृदुत्व ह्मणजे लवचीकपणा असण्यांत तिघीही सारख्याच आहेत. शब्दांत तीक्ष्णता व माधुर्य या मागांतही बहुधा साम्यच आहे. नानाविध विषयांवर ग्रंथ असण्यांत इंग्लिश भाषेपेक्षां या दोन्हीं भाषा फारच मागें आहेत. इतक्या कीं, "काव्येषुनाटकंरम्यं" सर्व काव्यांत शिरोमणीभूत जें नाटक काव्य त्याची या भाषांस ओळख देखील नाहीं. आणि तीं नाटकें इंग्लिशांत शेंकडों आहेत. या विचारावरून आरबी व पारशी भाषेंत जे गुण नाहींत ते इंग्लिश भाषेंत आ-

हेत आणि इंग्लीश भाषेंत नाहीं, असा एकही गुण या दोहों भाषेंत दिसत नाहीं तेव्हां या तिन्ही भाषेंत इंग्लिश भाषा विशिष्ट गुण संपन्न ह्मणण्यास अडचण राहिली नाहीं; या वरून एक्या इंग्लिश भाषेची संस्कृत भाषेशीं तुलना केली असतां आरबी व पारशी भाषा गतार्थ होतील. यास्तव आतां इंग्लिश व संस्कृत भाषेंतील गुणागुणांचा विचार करूं. आरंभीं संस्कृत व इंग्लिश भाषेच्या व्याकरण शास्त्राकडे लक्ष्य दिलें असतां खरोखर जमीन अस्मानाची तफावत आहे, असें, बिन्हरकत ह्मणावें. इंग्लिश भाषेला व्याकरण हें नांव मात्र माहित आहे, या पुढें व्याकरणाचें खरें स्वरूप काय हें कांहींच ती भाषा जाणत नाहीं या वरून इंग्लिश भाषेंत व्याकरणाचे अगदींच नियम नाहींत असें माझें मत समजूं नये. इतर भाषेप्रमाणें स्थूल नियम आहेत तथापि संस्कृत भाषेंतील अनंतावधि शब्दांतून ज्यांस व्याकरणाचा नियम नाहीं, असा एकही शब्द मिळणार नाहीं; आणि इंग्लिश व्याकरणाकडे पाहिलें तर व्याकरणाचे नियमानें बद्ध असा एकादा शब्द सांपडेल इतकें अंतर आहे. यावरून या दोन्हीं व्याकरणांत किती अंतर याचा सुज्ञांनीं विचार करावा. साधारण नामाला या इंग्लिश भाषेंत नियम नाहींत; हेंही असो. परंतु जीं नामें दूषित जाहलीं आहेत; त्यांची देखील इंग्लिश व्याकरण कांहींच गति करीत नाहीं, याहून आश्चर्य तें काय? उदाहरण (आय् ब्रो) अर्थ आय ह्मणजे डोळा, ब्रो ह्म० भोंवई, अशा वेगळ्या वेगळ्या अर्थांचीं दोन नामें असून (आय् ब्रो) या दोन शब्दांचा अर्थ भोंवई असा जाहला तेव्हां, भोंवई, इतका अर्थ सिद्ध करण्यास (ब्रो) एवढें नांव पुरे आहे. मग (आय) या नेत्रवाची शब्दाचा (ब्रो) या भोंवईवाची शब्दाशीं योग करण्याची जरूर काय? (डोळ्याची भोंवई) इतका अर्थ सिद्ध करण्याकरितां ह्मणावें तर पायाची भोंवई हाताची भोंवई अशा कांहीं अनेक भोंवया नाहींतच तेव्हां (ब्रो) शब्दास (आय) शब्दाचा योग अप्रयोजक झाला; याची गति काय हें विवेचन करणें इंग्लिश व्याकरणाचें काम होतें, परंतु ते कांहीं बोलत नाहीं. (ग्रास हापर) याचा अर्थ (ग्रास) ह्मणजे गवत व (हापर) ह्म० उडी मारणारा. ह्मणजे गवतावर उडी मारणारा असा सामान्य अर्थ दिसत असून, या दोन शब्दांचा अर्थ (टोळ) असा होतो, तेव्हां असा विशेष अर्थ होण्यास व्याकरणाचा नियम काय याचा शोध केला असतां कांहीं नियम मिळत नाहीं. या दोन उदाहरणांवरूनच इंग्लिश भाषेच्या व्याकरणांत उणीव किती आहे हें सहज लक्षांत येतें. असे शब्द संस्कृत भाषेंत नाहींत असें मी ह्मणत नाहीं; परंतु त्यांची उत्तम रीतीनें व्यवस्था लावून दिली आहे इतका विशेष. बरें जे कांहीं नियम ह्मणून केले आहेत त्यांत कोठें दोषही दिसतात; हें दाखवावयास लांब जाणें नलगे. (ग्रास–हापर) हेंच उदाहरण घेऊं. (ग्रास–हापर) अशीं दोन पदें आहेत. पहिल्याचा अर्थ गवत, आणि दुसऱ्याचा अर्थ उडी मारणारा असा होतो. आतां व्याकरण संबंधानें हीं दोनीं पदें काय

आहेत? ह्मणून प्रश्न केला असतां ( हापर ) हें विशेष्य व ( ग्रास ) हें हापर याचें विशेषण असें सर्व मोठे विद्वान उत्तर देतात. विशेषणाचें लक्षणाविषयीं इंग्लिश व्याकरणाचा नियम पाहिला तर विशेष्याचा गुण दाखविणारा जो शब्द तो त्या विशेष्याचें विशेषण होय. असा नियम केला आहे व हा नियम योग्यही आहे. परंतु वरील उदाहरणांत या नियमा प्रमाणें कांहींच नाहीं. ( हापर ) ह्मणजे उडी मारणारा याचें विशेषण ( ग्रास ) ह्मणजे गवत ही कोणत्या तऱ्हेची विशेष्य विशेषणाची संगती याचा सुज्ञांनीं विचार करावा. याचप्रमाणें ( रेन—बो ) या दोन्ही पदांचा मिळून अर्थ पर्जन्यांतील धनुष्य असा होतो, प्रत्येक पदाचें अर्थ ( रेन ) ह्मणजे पर्जन्य ( बो ) ह्मणजे धनुष्य असा होतो; आणि ( रेन ) ह्मणजे पर्जन्य हें ( बो ) ह्मणजे धनुष्य याचें विशेषण होतें ह्मणें, हें कसें होतें मात्र कोणजाणें; अशीं उदाहरणें बहुत आहेत. ही कदाचित् अगतिकागति मानिली ह्मणावें तर तसाही लेख दिसत नाहीं. तेव्हां इंग्लिश व्याकरण फार मोठ्या मनाचें असल्यामुळें, असल्या किरकोळ चुकांकडे तें चित्त देत नाहींसें वाटतें. फार तर काय, संस्कृत व्याकरणास चांगल्या अभ्यासी व बुद्धिमान् विद्यार्थ्यास निदान चार वर्षें लागतात. तेथें केवळ इंग्लिश व्याकरण शिकण्यास हल्लीं शेंकडो शाळा आहेत त्यांतून विद्यार्थी किति दिवस अभ्यास करतात, याचा विचार करावा ह्मणजे झालें. दोहों भाषेंतील नामसंग्रहाकडे नजर केली तर ज्या एकाद्या राजापाशीं (धनकोश) ह्मणजे जामदारखाना अधिक तो राजा बलाढ्य हें उघड आहे. याच न्यायानें भाषा हाच एक राजा कल्पिला तर नाम हेंच त्याचें धन होय, आणि ह्मणूनच ज्या भाषेंत (शब्दकोश) ह्मणजे शब्दसंग्रह विशेष ती भाषा शक्तीनें अधिक हें सांगणें नको. जसें व्याकरण विषयांत महदंतर दिसलें तसेंच या विषयांत ही दिसल्या वांचून राहणार नाहीं. इंग्लिश भाषेंत मोठमोठे जितके कोश आहेत; त्यांत ( वेपूस्टर ) साहेबानीं जो कोश केला तो मोठा आहे. पुष्कळ युरोपियन् व नेटिव जे इंग्लिश चांगलें जाणतात, ते असें ह्मणतात कीं, ( वेपूस्टर ) कोशांत नामें आलीं नाहींत अशीं इंग्लिश भाषेंत व्यवहारांतील विरळ नामें सांपडतील. त्या मानाचा संस्कृत कोश हल्लीं होत असून त्याचा जो कांहीं भाग तयार जाहला आहे तोच ( वेपूस्टर) कृत कोशा एवढा किंबहुना कांहीं मोठाच आहे. हा कोश समग्र तयार होईल, तेव्हां ( वेपूस्टर ) कृत कोशाहून निदान दुप्पट तरी होईल. बरें एवढ्यानें तरी संस्कृत शब्दांचें कोठार सरेल काय? खचीत नाहीं. संस्कृत भाषेंत नामाचें आनंत्य कसें आहे याचें एक लहानसें उदाहरण देणें प्राप्त आहे, ह्मणजे वाचणाराचे मनांत साधारण कल्पना येईल. इतर सर्व कोश एकीकडे ठेऊन सर्वांत प्रसिद्ध अशा अमर कोशाचेच आधारें केवळ चंद्राच-

क नामेंच उदाहरणास घेतों. अमरसिंहानें चंद्राचीं नामें वीस दिलीं आहेत तीं येणे प्रमाणें:— ( अमरकोशप्रथमकांडदिग्वर्ग) " हिमांशुः, चंद्रमाः, चंद्रः, इंदुः, कुमुदबांधवः विधुः सुधांशुः, शुभ्रांशुः, ओषधीशः, निशापतिः, अब्जः, जैवातृकः, सोमः, ग्लौः, मृगांकः कलानिधिः, द्विजराजः, शशधरः, नक्षत्रेशः, क्षपाकरः " या वांचून नानार्थ वर्गांत असतील तीं. अमरसिंव्हानें कंठतः वीसच नामें दिलीं, परंतु इतक्यांचाच विस्तार लिहून पुरवणार नाहीं इतका होतो तो असा (हिमांशुः) हिम-अंशु हिम ह्मणजे थंड अंशु ह्म० किरण थंड आहेत किरण ज्याचे ह्मणजे चंद्र, असा या नांवाचा अर्थ जाहला. यावरून अमरसिंहानें बाकीचीं नामें कंठतः सांगितलीं नाहींत. तरी या कवीनें हिमाचीं व अंशु ह्मणजे किरणाचीं जितकीं नामें सांगितलीं असतील त्या प्रत्येकांतून एक एक घेतलें ह्मणजे अमरसिंहाला मान्य अशीं चंद्राचीं नामें होऊंशकतील. त्याच प्रमाणें कुमुदबांधवः, सुधांशुः, शुभ्रांशुः, ओषधीशः, निशापतिः, अब्जः, मृगांकः, कलानिधिः, द्विजराजः, शशधरः, नक्षत्रेशः, क्षपाकरः हीं सर्व नामें वरलिहिल्याप्रमाणें फिरविलीं असतां किती होतील, त्याची गणना करणें केवळ अशक्य आहे. तरी हें नानात्व केवळ काव्यव्युत्पन्नांस समजण्यासारखें काव्यरीतीनें वेगळे वेगळे दोनशब्द घेऊन सुलभ रीतीनें करून दाखविलें. व्याकरण रीतीनें अनेक धात्वर्थ व प्रत्यय लाऊन नवे शद्ब केले तर किती होतील, हें सांगणें अनुमानाबाहेर आहे. आतां भाषेला मृदुत्व किंवा लवचिकपणा असणे ह्मणजे काय? व या दोहों भाषांतून तें कोणास आहे याचा विचार करूं. एकादें पात्र करावयाचें तर कसाही कारागीर असेल तरी सुवर्णाचें किती लवकर व कमीश्रमानें होतें तेंच पात्र लोखंडाचें केलें तर किती श्रम करावे लागतात तरी सुवर्णासारिखें सुंदर होणें कठीण हें प्रसिद्ध आहे; आणि याचें कारण सुवर्णाचे अंगीं मृदुत्व जास्त हेंच होय. याच न्यायानें ज्या भाषेंत मार्दव अधिक त्या भाषेंत ग्रंथ कमीश्रमानें व अधिक सुंदर आपलाले शक्तितारतम्यानें कवि करूं शकतील हें सर्व मान्य होय. असला हा अत्युत्कृष्ट गुण इंग्लिश भाषेंत मुळीं नाहीं; आणि संकृत भाषा या गुणानें परिपूर्ण आहे हें निर्विवाद सिद्ध आहे. मृदु ह्मणजे एकादें नाम अथवा वाक्य पुष्कळ तऱ्हेनें फिरवितां येणें, वर नामाच्या बाहुल्याचें उदाहरण जें लिहिलें तेंच संकृत भाषेच्या लवचिकपणाचेंही पूर्ण उदाहरण आहे. याहूनही संकृत भाषेला समास प्रकरणाचें साह्य मिळाल्यामुळें या भाषेची लवचिकपणाच्या गुणांत सीमाच जाहली. कोणत्याहीं दोन नामांचा उच्चार केला कीं त्यांचे वक्तयाच्या इच्छेप्रमाणें त्या एकाच पदाचे नानाभेद होऊं शकतात. उदाहरण (गज-मुख) या दोन पदांचा द्वंद्व समास केला तर हीं दोनही पदें मुख्यच राहून गज ह्मणजे हत्ती व मुख ह्मणजे मुख असे वेगळे अर्थ होतात. याच पदांचा तत्पुरूष केला असतां गज पदास गौणता येऊन मुख पदास मुख्यता आल्या

नें गजाचें मुख असा अर्थ होतो. या सर्वांहून विलक्षण चमत्कार तो हा कीं या दोन पदांचा बहुव्रीहि समास केला असतां प्रत्यक्ष उच्चारित गजमुख हीं दोनही नामें गौण होऊन अनुच्चारित अशा तिसऱ्याच (गणपती) पदाचा बोध होतो. ही बहुव्रीहि समासाची इतर सर्व समासांपेक्षांही विशेषच खुबी आहे. ह्या समासापासून कवीला कोठें कोठें अस सुंदर अलंकार करितां येतो कीं तसा अलंकार इतर भाषेच्या कवीस साधणें अशक्य आहे. कोणी साधीलच तर संस्कृत कवीचें जेथें चार पांच अक्षरांत कार्य होईल, तेथें इतरांस त्या-च्या दसपट अक्षरें खर्चावीं लागतील; एवढें गौरव येऊनही तें सौंदर्य राहणार नाहीं, हें तर आहेच. उदाहरणार्थ मीं केलेल्या आर्यां पैकींच आर्या घेतों.

साक्षात्ब्रह्मचिनिर्गुण सगुणत्वेंह्मणतिज्यासहेरंब ॥
होउनियांत्वद्बालक तोश्रीगजमुखतुलाह्मणे अंब ॥ ४५ ॥
त्वद्वाहनासि भीमी ह्मणुनीदृढतवगळामिठीघाली ॥
तूंज्ञ्छीलाप्रमुदित पाहुनिशिववदनहाससीगालीं ॥ ४६ ॥

या आर्येंतील (गजमुख) एवढ्या पदानेंच (गणपतित्व) व गजमुखत्व या दोन्हीची सिद्धी झाली. तेणेंकरून सिंहाला भिणें वगैरे सर्व गोष्टी संगत जाहल्या; इतर भाषेंत ही रीती नसल्यानें (गजमुख) पदानें गणपतीचा बोध होत नाहीं, तसेंच गणपती शद्बानें गजमुख सिद्धि होत नाहीं ह्मणून असला अलंकार इतर कवींस करतां येणार नाहीं. पुष्कळ अक्षरें खर्चून कथंचित् साधलाच तर गौरव होऊन ग्रंथांत स्वारस्य राहणार नाहीं. इतकें लिहिण्यानें भाषेंतील लवचिकपणा ह्मणजे काय व त्याचा उपयोग किती आहे हें चतुरांस सहज कळेल. आतां वर्णांच्या कठोर मार्दवतेकडे वळूं. या विषयावर साहित्यशास्त्र मुख्य असून (काव्यप्रकाश) (रस गंगाधर) इत्यादि ग्रंथांत बहुत विचार केला आहे. तें सर्व येथें लिहिलें तर मोठा विस्तार होईल. ह्मणून इतकेंच सांगतों कीं मधुररसाचे वर्णनांत. ट, ठ, ड, ढ, हे चार वर्ण असूं नयेत. आणि उद्धतरसवर्णनांत हे चार वर्ण असावेत असें आहे. हा वर्णविचार ग्रंथकारांनीं स्वेच्छानुरूप केला नसून स्वाभाविक तत्तद्वर्णगत माधुर्य कठोरता, पाहून त्या त्या ह्मणजे, मधुर, कठोर, रसांत तशा तशा वर्णांची योजना केली आहे. इंग्लिश भाषेंतील एकंदर शद्बांचा विचार केला तर इंग्लिश भाषेंतील बहुतेक शद्ब, ठ, ड, या दोन वर्णांनीं युक्त असतात असें सिद्ध होतें. या मुळें मधुर रस वर्णनांत इंग्लिश कवींस शद्बांची जरा उणीव पडेल असें वाटतें. आणि कठोर रसाहून मधुररसा-

ची योग्यता फार आहे. हें ही सर्व सहृदयहृदय मान्य करितात. शिवाय आपले भाषेंत डकारादिवर्ण कठोर असल्या मुळें ते कर्णप्रिय नाहींत असें, इंग्लिश, मुसलमान, यांणीं स्वतः देखील कबूल केल्याचें कोठें कोठें उदाहरणांत उघड दिसतें; जसें (जड्ज) असा वास्तविक शद्ब असून त्यांतील डकाराचा उच्चार न करितां केवळ जज्ज असा उच्चार करितात. तसें यवन विहिरीस (बावडी) असें हिंदुस्थानी भाषेंत नांव असून त्यांतीलही ड वर्णाच्यास्थानीं (बावली) असें लिहितात. इतकें बरें आहे कीं, मुसलमान उच्चारा प्रमाणें लिपींतही फेर करितात आणि इंग्लिश लिपींत (ड) वर्णच लिहून उच्चारांत मात्र लोप करितात हें फारच चमत्कारिक व वाईट होय येणें करून वर्णविन्यासांतही संस्कृताचीं बरावरी इतर भाषांच्यानें होत नाहीं अशी खात्री होईल. आणखी एक गोष्ट संस्कृत भाषेंत फार चांगली आहे तीही लिहिल्या वांचून माझ्यानें राहवत नाहीं; ती गोष्ट धर्मसंबंधानें मिळाली ह्मणा अगर कवींनीं तसे तसे श्लोक मनांत आणून काल्पनिक रचली ह्मणा; परंतु त्या पासून कवीला नाना तऱ्हेचे अलंकार रचतां येण्यास मार्ग जाहला यांत संशय नाहीं. ती गोष्ट ही कीं, एका विषयाचें वर्णन करीत असतां दुसऱ्याही नाना विषयांचें वर्णन करितां यावें आणि विषयांतराचें वर्णन केलें असें तर होऊंनये. उदाहरणार्थ गंगा हाच विषय घेऊं. गंगेचें वर्णन ह्मणजे केवळ नदीचें वर्णन होय. तेव्हां नदी संबंधानें वर्णन करणें हें सर्व कवींला साधारणच आहे. परंतु त्याच नदीवर देवत्वाची कल्पना असल्यामुळें पारलौकिक जें लिहिणें तेंही गंगावर्णनरूप विषय कायम ठेवून लिहितां येतें. समुद्र सर्व नद्यांचा पति आणि सर्व नद्या समुद्राच्या स्त्रिया होत. अशी कल्पना असल्यामुळें दांपत्य भावाचे सर्व रस करावयास मोठी सोय जाहली; व इतर नद्या सवती जाहल्यामुळें सापत्नभाव ही वर्णनीय झाला. याचप्रमाणें हिमालय पर्वतांतून भागीरथी निघाल्यामुळें तो पर्वत गंगेचा बाप आणि यमुनानदी त्याच पर्वतांतून निघाल्यामुळें गंगेची बहीण ही कल्पना उत्पन्न झाली. येणें करून परस्पर बापाचा व कन्येचा व उभयतां भगिनींचा प्रेमावर्णन करण्यास मोठी जागा जाहली. इतर भाषांत ह्या कल्पनाच नसल्यामुळें, एकाच विषयाचें इतक्या तऱ्हेनें वर्णन करणें केवळ दूरापस्तच होय. माझे आंगीं कविता शक्ति मुळींच नाहीं हें मी कबूल करतों, तथापि वरील कल्पनांनीं वेळोंवेळीं माझ्या सारख्यास देखील बरेंच साह्य जाहलें आहे. हें त्या त्या प्रकरणांतील आर्या वाचल्या ह्मणजे ध्यानीं येईल. ह्मणून तीं तीं स्थळें दाखवितों. गंगा नदीवर देवत्व असल्या मुळें पत्र (१) आर्या (८) इत्यादि. हिमालयावरून गंगापुढें गेली

तेव्हां पितृविरह पत्रें १९ इ. प्रयाग येथें गंगायमुनेचें भगिनीप्रेमवर्णनपत्रें ५० इ. समुद्र संगम स्थलीं दांपत्यभाव प. ७१ इत्यादि. याप्रकारें केलेली भाषांची तुलना जर बरोबर आहे तर सुज्ञ पुरुषांचे चित्तीं संस्कृत भाषेची थोरवी इंग्लिशभाषेहून किती आहे हें आरूढ जाहल्यावांचून राहणार नाहीं; याच मानानें अलंकार अथवा साहित्य शास्त्र हेंही संस्कृत भाषेंत पूर्णदशेस पावलें असून इंग्लिश भाषेंतील व्याकरणा सारिखें बाल्य दशेंत आहे हें विवाद रहित आहे. नाट्य शास्त्राची तर इंग्लिश भाषेला ओळख देखील नाहीं. ह्या अलंकार व नाट्य शास्त्रासंबंधी आणखीं उदाहरणें देत गेलों तर निबंधाचें रूप जाऊन हा लेख मोठासा एक ग्रंथच होऊं लागेल याजकरितां हा विषय आतां सोडून देतों. साधारण इतकें मात्र लिहिलें पाहिजेकीं ह्या दोन शास्त्रांपासून कवीची बुद्धि अत्यंत विशद व मार्मिक होते यांत संशय नाहीं. या सर्व गुणांनीं संस्कृत भाषा उत्तम आहे हें आलीकडील विद्वान व सुधारलेले लोकांस ही मान्य आहे; तथापि या भाषेंत कांहीं दोष आहेत असें त्यांचेंमत आहे. त्यांत अतिशयोक्ति हा दोष फारच मोठा आहे असें ते ह्मणतात; या करितां या विषयावर थोडेंसें लिहिणें भाग आहे. जरी कांहीं अंशीं त्यांचें हें ह्मणणें खरें आहे, तरी जितक्या मानानें संस्कृतांत अतिशयोक्ति आहे, त्यापेक्षां तिचे विषयीं लोकांचे मनाचाग्रह विलक्षण अधिक झाला आहे. हें दाखविण्या करितां अतिशयोक्तीचीं उदाहरणें तऱ्हेतऱ्हेचीं दाखऊन निराकरण करितों (उदाहरणें) भारत चंपू स्तबक १ श्लोक ४ यस्यामुदग्रनृपमंदिरचंद्रशालावातायनेमतिवशाद्वपुषिप्रसक्तां; दीपाग्रधूममषिकांशिशिरांशुबिंबेमोहात्कुरंगइतिमुग्धजनावदंति १ दुसरा प्रकार वाज्यंचवर्तिसंयुक्त वन्हिनायोजितंमया; दीपंगृहाणदेवेशत्रैलोक्यतिमिरापहं २ तिसरा प्रकार (भारत कर्णपर्व) सप्तद्वीपावसुमतीसशैलवनकानना; गीर्णचक्रासमुत्क्षिप्ताकर्णेनचतुरंगुलं ३ चौथा प्रकार (रामरक्षा) चरितंरघुनाथस्यशतकोटिप्रविस्तरं; एकैकमक्षरंपुंसांमहापातकनाशनं ४ पांचवा प्रकार (श्रीगणपतिस्तोत्र) जपेद्गणपतिस्तोत्रंषड्भिर्मासैःफलंलभेत्; संवत्सरेणसिद्धिंचलभतेनात्रसंशयः ५ सहावा प्रकार व्रतानामुत्तमव्रतं इत्यादि. यांतील प्रथम श्लोक मात्र अतिशयोक्तीचें खरें उदाहरण आहे दुसरे सर्व श्लोक ज्यांत खरी गोष्ट थोडी असून लोकांस विस्मय आणि कौतुक वाटण्यासाठीं वडील आणण्याकरितां फुगाऊन लिहिलें आहे असा भास होतो. आणि अशा जातीचे श्लोक वाचल्यानें वाचणारांचे मनांत संस्कृत भाषेत अतिशयोक्ति करण्याची चाल फार आहे असी अटकळ होते, परंतु हे केवळ अतिशयोक्तीचे आभास मात्र आहेत. यांचा बारीक विचार केला तर यांत अतिशयोक्ति मुळींच नसून संस्कृत भाषेच्या सौंदर्याचें मात्र अतिशय आश्चर्य वाटेल. या वाक्यांची खरी व्यवस्था लावण्या पूर्वी, या श्लोकांचे अर्थ प्रथमतः कसे

लोकांच्या मनांत येतात ते दाखवितो. प्रथमश्लोकाचा भाव, हस्तिनापुरींतील घरें इतकीं उंच होतींकीं, उपरमाड्यांत लाविलेल्या दिव्यांच्या काजळी, साण्यावाटे बाहेर जाऊन चंद्राचे आंगास झोंबल्या तो हा कलंक चंद्राचे ठायीं दिसतो, त्यास हरिण असें लोक ह्मणतात हें मिथ्याहोय. दुसऱ्या श्लोकाचा भाव, देवांची पूजा करते समयीं पूजक ह्मणतो तिन्ही लोकांतील अंधकाराचा नाश करणारा असा हा दीप मी अर्पण करितों याचा स्वीकार करावा. तिसऱ्या श्लोकांतील भाव, कर्णार्जुनाचें द्वंद्व युद्ध होत असतां कर्णाच्या मृत्युकाळीं ब्राह्मणाच्या शापामुळें पृथ्वीनें कर्णाच्या रथाचें चक्र भक्षिलें, तेव्हां कर्णानें चक्रोद्धारार्थ होतें तितकें बळ वेचिलें, तथापि चक्र निघालें नाहीं; ते समयीं कर्णाचे आंगीं बळ कितीहोतें व ब्राह्मण शाप किती दुर्वार होता हें व्याससांगतात. सातद्वीपांनीं व नाना पर्वतादिकांनीं युक्त जी पृथ्वी ती कर्णानें चार अंगुलें उचलिली, परंतु चक्रनिघालें नाहीं. चवथ्याश्लोकाचा भाव, रामचंद्राचें चरित्र शंभरकोटि आहे, आणि त्यांतील प्रत्येक अक्षरही महापातकाचें नाशक आहे. पांचव्या श्लोकांतील भाव, हें गणपतीचें स्तोत्र भक्तिपूर्वक सहा महिने पठण केलें असतां चतुर्विध पुरुषार्थांची प्राप्ति होईल. सहाव्या वाक्यांतील भाव, हें अमुकपूर्वोक्त व्रत सर्वांत उत्तम आहे. यांतील प्रथम श्लोक एक प्रकारचा होय. दुसरा व तिसरा हें एक प्रकारचे, चवथा व पांचवा हे एक प्रकारचे, आणि सहावा एक प्रकारचा आहे. प्रथम श्लोक अतिशयोक्तीचें वास्तविक उदारण आहे. तेव्हां त्याच्या विचाराची जरूर नाहीं. आतां दुसऱ्या व तिसऱ्या श्लोकांचा अर्थ ऐकिला ह्मणजे कितीही बलवान् मानिलातरी देहधारी कर्णानें नवखंड पृथ्वी चार अंगुलें उचलिली, तसेंच एवढ्याशा दीपाचे आंगीं तीन लोकांत सांठलेला अंधकार दूर करण्याची शक्ति आहे ही भली लांबलचक अतिशयोक्ति आहे असें वाटल्या वांचून रहाणार नाहीं. जुन्या शास्त्री वगैरे भोळ्या लोकांस ही गोष्ट खरीच वाटये यामुळें ह्यांचे मतेंही अतिशयोक्ति नव्हेच. आलीकडील विद्वानांस मात्र ही अतिशयोक्ति वाटते. करितां त्यांणीं पुढील समाधान लक्षपूर्वक वाचावें अशी त्यांस मी प्रार्थना करितों. मोठ्या डोळयाच्या गणूस बोलाव, तसेंच पुष्कळ द्रव्य ज्यापाशीं आहे त्या गणूस बोलाव. मोठ्याडोळ्याचा, पुष्कळ द्रव्यवान्, अशीं वाक्यें उच्चारिलीं असतां बोलाऊं जाणारास त्या त्या गणूचा बोध होऊन तो त्यास आणितो. तथापि त्यांत फेर इतका असतो कीं, पहिला गणू आपले विशेषणासहित येतो, व दुसरा विशेषणा वांचून येतो. यावरून विशेषणासहित त्या त्या व्यक्तीनें यावें अशी वक्त्याची इच्छा नाहीं; पहिल्या मनुष्याचें विशेषण अगतिक त्याच्या बरोबर येतें, इतकेंच. त्या त्या व्यक्तीची ओळख लागावी येवढ्याकरितांच मात्र हीं विशेषणें होत. क्रियेमध्यें त्या त्या विशेषणाची जरूर आहे असें अगदीं स-

मजूं नये. याच न्यायानें सप्तद्वीपादिक त्रिलोक तिमिरापहादिक पृथ्वीचें विशालत्व व दीपाचें शक्तिमत्व दाखविणारीं मात्र विशेषणें होत. कर्णानें जी पृथ्वी उचलिली त्या क्रियेंत सप्तद्वीपादि विशेषणांचें ग्रहण करण्याची अवश्यकता नाहीं. केवळ एवंविशेषणाविशिष्ट पृथ्वीचा भाग कर्णानें उचलिला. तसेंच या पूजक पुरुषानें जो दीप देवास दाखविला त्यांत त्रिलोक तिमिरापहत्व गुण आहे ह्मणण्याचें कारण दिसत नाहीं. केवळ दीपाचे अंगीं त्रिलोक तिमिरापहृत्व आहे हें सांगणें एवढीच वक्तुरिछा ह्मटलें तरी चालेल. देणें करून कर्णानें संपूर्ण पृथ्वी उचलिली अथवा न उचलिली हें मी कांहींच ह्मणत नाहीं. कारण प्रकृतिपुराणांतील गुणागुणांचा विचार करण्याचा आमचा उद्देश नसून केवळ काव्यांच्या गुणदोषांचा विचार करणें आहे, तर उत्सर्गतः दिसणारी एकादी असंभाव्य गोष्ट वाचली कीं, अतिशयोक्तीचे संख्येंत तिला घालून संस्कृतांतील अतिशयोक्तीची संख्या वाढविणें न्याय्य नाहीं. ज्यांत खऱ्या अतिशयोक्ती आहेत अशा वाक्यांस अतिशयोक्तींत घालणें मात्र बरावर आहे. हें दाखविण्या करितां वरील उदहारणें लिहिलीं आहेत; तर वाचक हो, कृपाकरून विचार पूर्वक पहा ह्मणजे सरासरी इतर भाषे प्रमाणेंच संस्कृतांत अतिशयोक्ति आहे अशी खात्री होईल. वरील चवथ्या व पांचव्या श्लोकांत ईश्वराच्या स्तोत्रांतील प्रत्येक अक्षर देखील महापातकाचें नाशक आहे व स्वल्पकालानें चतुर्विध पुरुषार्थ देणारें आहे. यांत ईश्वराचें नांव पापनाशक व इष्टार्थ देणारें आहे याज विषयीं कोणत्याही लोकांचें व शास्त्राचें मत वादरहित होय. फक्त आंतील एकैक अक्षर देखील पापनाशक व मोक्षदेणारें हें ह्मणणें मात्र अतिशयोक्ति आहे. आतां अशी शंका उत्पन्न होण्याचें बीज पाहूं गेलें असतां एक अक्षर हें त्या त्या ग्रंथाच्या मानानें त्या त्या ग्रंथाचा अत्यंत लहान अवयव असल्या मुळें, हा शंकाभास लोकांचे मनांत शिरतो. वास्तविक विचार झाला तर या शंकेची लोकांचे चित्तांत उठावण होण्यास कांहींच बीज दिसतनाहीं. अनेक अक्षरें मिळालीं असतां एक पद होतें. अनेक पदें एकत्र झालीं ह्मणजे एक वाक्य होतें. आणि एकार्थक अनेक वाक्यांचा समुदाय एकत्र जमला ह्मणजे त्यास एक ग्रंथ हें नांव मिळतें. ह्मणजे एक ग्रंथ होण्यास अनेक वाक्यांची, एक वाक्य होण्यास अनेक पदांची, आणि एक पद होण्यास अनेक वर्णांची, जरूर आहे. व ती जरूर अशी आहेकीं, त्यांत न्यूनाधिक भाव नाहीं, ह्मणजे एका ग्रंथांतील अनेक वाक्यांत अमुक वाक्य अधिक कामाचें व अमुक कमी कामाचें नसून सर्व सारखींच आहेत. याच प्रमाणें एका वाक्यांतील अनेक पदें सारखींच, तसेंच एका पदांतील अनेक वर्णही सारखेच उपयोगाचे आहेत.

हेंच उदाहरणानें स्पष्ट करितों. उदाहरणार्थ ( गणपति ) हें पद घेतलें तर यांत ( ग्, अ, ण्, अ, प्, अ, त्, इ ) असे आठ वर्ण आहेत. यांतून कोणत्या एकावर्णाचा उच्चार करण्याचा सोडल्यास (गण) म्हणजे जीव यांचा (पति) म्हणजे स्वामी असा जो अर्थ ( गणपति ) या पदांत आहे त्यास न्यूनता सारखीच येणार आहे. याच प्रमाणें अनेकपदघटित जें वाक्य त्यांतून कोणतेही पद अगर अक्षर उच्चारण्याचें सोडल्यास पदार्थप्रमाणें वाक्यार्थांतही न्यूनता सारखीच येणार आहे. उदाहरण ( गणपति, जगत्कारण, आहे ) या वाक्यांत पदें तीन आहेत व अक्षरें २१ आहेत. या वरून अर्थबोध होण्यास तो तो ग्रंथ जितका उपयोगी आहे तितकेंच त्या त्या ग्रंथांतील प्रत्येक अक्षर ही उपयोगी आहे. हें सहजच लक्षांत येईल ( जपेद्गणपतिस्तोत्रंषड्भिर्मासैःफलंलभेत् ) या ही वाक्याची वरील विचारानेंच गति होते. जसें एक अक्षर हें मोठ्या ग्रंथाचा एक स्वल्प अवयव आहे, तथापि उपयोगास सारखेंच आहे हें सिद्ध करून दाखविलें. तसेंच अखंड दंडायमान जो मोठा काल त्याचा सहा महिने हा अत्यंत स्वल्पकाल आहे, तथापि ईश्वराचे स्तवानें कांहीं कालानें उत्तम फल मिळतें हें जर खरें आहे तर एक पळ देखील अखंड दंडायमान काला बरोबरीचें उपयोगी म्हणण्यास कांहीं अडचण नाहीं. मग सहा महिने काल तर मोठाच आहे. (व्रतानामुत्तमंव्रतं) कितीही लहान व्रत असलें तरी सर्व व्रतांत हेंच व्रत उत्तम असें हरएक व्रतास लिहितात. येणें करून ही अतिशयोक्ति आहे असें वाटतें, परंतु कोणच्या फलाच्या उद्देशानें हें लहानसें व्रत सांगितलें, याचा विचार प्रथम केला म्हणजे ही अतिशयोक्ति आहे असें वाटणार नाहीं. जसें एकाद्या रोगाची नाशक अगदीं क्षुल्लक वनस्पति असते. आणि त्या रोगास उद्देशून त्या वनस्पतीची योग्यता सांगतांना मोठ्या मोठ्या इतर रसायणादिकांहून ही वनस्पति फार गुणकारी आहे असें म्हटलें असतां, सांगणारानें अतिशयोक्ति केली असें कोणांसही वाटणार नाहीं. प्रसंगें करून संस्कृत भाषेंतील अतिशयोक्तिदोषशंकेचें यथामति निराकरण केलें. आतां प्रकृत विषयाकडे वळतों. उत्तम ग्रंथ होण्यास संस्कृत भाषाच इतर भाषेहून सर्वगुणांनीं योग्य हेंही विचारपूर्वक सिद्ध जाहलें. आतां पूर्वोक्त गुणांनीं संपन्न असा कोणी एक कवि आहे कीं नाहीं; याचा विचार करणें आहे. परंतु यास एक मोठी अडचण आहे; ती ही कीं, संस्कृत भाषेंतील कवीच्या गुणदोषांचें विवेचन कसें तरी मला करितां येईल. परंतु पारशी, आरबी, इंग्लिश इत्यादि भाषांचीं स्वरूपें कशीं आहेत इतकी मात्र कांहीं ग्रंथ वाचल्यानें आणि त्या भाषेंतील

विद्वान् लोकांच्या सहवासानें माहिती आहे. परंतु त्या त्या भाषेतील मोठाल्या कवींचे प्रौढ ग्रंथ वाचून आंतून परस्परांची गुणदोष विवेचनपूर्वक तुलना करणें माझे शक्ती बाहेर आहे. आतां हें खरें आहे कीं, सांप्रत कालीं इतर भाषेतील कवींपेक्षां इंग्लिश भाषेतील आणि संकृतभाषेतील कवींची ख्याति बहुत आहे; त्यांतही इंग्लिश कवींतील (शेक्सपियर) आणि संकृत कवींतील (कालिदास) हे उभयतां कविराज ह्मटले गेले आहेत. कालिदासाचे अमूल्य ग्रंथ वाचून अस्मदेशीयांस जो आनंद झाला त्याचे उद्गार:—

पुराकवीनांगणनाप्रसंगे कनिष्ठिकाधिष्ठितकालिदासः ॥
अद्यापितत्तुल्यकवेरभावादनामिकासार्थवतीबभूव ॥१॥
कालिदासोगिरांसारः कालिदासःसरस्वती ॥
चतुर्मुखोयथासाक्षात् विदुर्नान्येतुमादृशाः ॥२॥

जयदेव कवींनीं संकृत प्रसन्नराघव नाटकांत ह्मटलें आहे कीं, "कविकुलगुरुः कालिदासोविलासः" हा कालिदास कवितेचा मूर्तिमान् विलासच आहे. याप्रकारचे अनेक अद्वितीय व इतराला दुष्प्राप असे निघाले. केवळ आमचे देशांतील विद्वानच असें ह्मणून राहिले असें नाहीं. परद्वीपस्थ जर्मन, फ्रेंच, इंग्लिश, आदिकरून सुधारलेले विद्वान् देखील कालिदास हा आपले देशांतील ( शेक्सपियर )चे अगदीं समतोल बरोबरीचा कवी असानिर्विवाद जागोजागीं लेख देतात. किंबहुना कालिदासाला ( इंडियनशेक्सपियर ) हिंदुस्थानचा ( शेक्सपियर )असें नांव देतात. कदाचित् अस्मदेशीयांचें मत पक्षपाती असेल ह्मणून त्यांनीं कालिदासाला दिलेलें अद्वितीयत्व क्षणभर राहूंद्या. परंतु परद्वीपस्थांनीं देशाभिमान सोडून मोकळ्या अंतःकरणानें केलेली जी बरोबरी ही तर कालिदासाच्या उत्कृष्टतेची मजबूद साक्ष ह्मटलें पाहिजे. परंतु हें मोठें विस्मय आणि खेद देणारें आहे कीं, ज्याला अन्य द्वीपस्थ देखील स्वदेशाभिमान मनांत न आणितां केवळ गुणांकडे पाहून आपले देशांतील अद्वितीय मानलेल्या कवीच्या बरोबर एकदम नेऊन बसवितात; आणि आमचे देशांतील अलीकडे सुधारलेल्या विद्वानांपैकीं कांहीं त्या कालिदासाला शेक्सपियरपेक्षां न्यून ह्मणतात. कांहीं एक तर ( शेक्सपियरकृत् ) जो एकादा अगदीं निकृष्ट ग्रंथ तो कालिदासकृत् अत्युत्कृष्ट ग्रंथाहून उत्कृष्ट आहे असें निःशंक ह्मणतात. असो, परद्वीपस्थांच्या परगुणग्रहणाच्या या अबाधित गुणाचे आभार मानिले पाहिजेत. माझे मनांत या उभयतां कविराजांच्या ग्रंथांतील गुणदोषांचें विवेचन करून कसे न्यूनाधिक भाव ठरतात हें पाहणें आहे. परंतु एवढा मोठा विषय हातीं घेण्यास मी अशक्त आहें, करितां कोणी दोनही

भाषा जाणणाऱ्या विद्वानानें याचें विवेचन केलें असेल अथवा करून प्रकट करील तर मजवर व इतर लोकांवर मोठे उपकार होतील. तावत्काल पर्यंत परद्वीपस्थ विद्वानांनीं केलेली बराबरीच आह्मींही कबूल करितों. तथापि पूर्वी मी भाषेच्या गुणागुणांचा विचार करून निष्कर्ष केलेला जर खरा आहे, तर कविसाम्य आलें तरी भाषेच्या उत्कृष्टतेमुळें संस्कृत काव्यच अधिक मधुर होईल एवढें लिहून हा निबंध समाप्त करितों.

**समाप्त**